

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन



वर्ष २ : अंक ४ : दिवाळी १९८४






अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )

**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे; अंजली सोमण, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ ( दूरध्वनी ५९२५८ )

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर, पुणे ४११००१ ( फोन ६३४९६, शिवाय फोन ५४०६९ )

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक : मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, ४६१।४ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

# कुंठित झालेली ज्ञानगंगा

परवा एका ग्रंथपालन क्षेत्रातल्या भारतीय व्यक्तीने लिहिलेला एक निबंध वाचण्यात आला. भारतामधले भाषाविज्ञानक्षेत्रामधले लेखक आधारासाठी वाङ्मयनिर्देश कशा पद्धतीने करतात याची पाहणी त्यात १९७१ ते १९८० या दशकाच्या मर्यादेत केली होती. त्यातली काही ठळक निरीक्षणे पाहण्याजोगी आहेत (आकडेवारी आपण बाजूला ठेवू) :

(१) त्यांची मदार मुख्यतः छापील पुस्तकांवर आहे, नियतकालिकातील लेख, अप्रकाशित पदवीप्रबंध, परिषदा किंवा चर्चासत्रे यांची इतिवृत्ते इत्यादींच्या वाटेला ते फारसे जात नाहीत.

(२) इंग्लिशखेरीज अन्य देशीविदेशी भाषांमधली सामग्री ते फारशी पहात नाहीत. इंग्लिशमध्ये देखील अमेरिकन सामग्रीवर भर. इतर भारतीय लेखकांनी काय लिहिले आहे हे पाहण्याची त्यांना फारशी गरज वाटत नाही. प्राचीन भारतीय भाषापंडितांची हजेरीही लागत नाही.

(३) पुस्तकांमध्येही त्यातल्या त्यात पाठ्यपुस्तकांवर भर दिसतो. मौलिक संशोधनग्रंथाकडे तितके लक्ष दिसत नाही.

(४) विदेशी संदर्भ गेल्या सहा वर्षांतले फारच थोडे आहेत, मुख्यतः त्याच्या अगोदरचेच आहेत.

(५) भाषाविज्ञानाच्या काही ठराविक उपशाखांतील वाङ्मयातील संदर्भनिर्देशच जास्त करून आढळतात.

(६) त्यांचे भाषाविज्ञानक्षेत्राच्या बाहेरच्या संलग्न क्षेत्रांमधील वाङ्मयाचे वाचन फारसे दिसत नाही.

पूर्वी प्रकाशित झालेल्या दुसऱ्या दोन अहवालांचा हवाला देऊन या निबंधात असेही म्हटले आहे की, इतिहास आणि सामाजिक विज्ञानाशाखा या क्षेत्रांमधील संशोधकीय लिखाणात यापेक्षा फारशी वेगळी परिस्थिती नाही.

ही आताच दिलेली निरीक्षणे इतकी बोलकी आहेत, इतकी आपल्याला मान खाली घालायला लावणारी आहेत की त्यांच्यावर अधिक भाष्य केले नाही तरी ती आपल्याला आत्मपरीक्षणाला प्रवृत्त करतील.

त्यांतल्या एका निरीक्षणाकडे मला आपले विशेष लक्ष वेधायचे आहे. ते निरीक्षण

म्हणजे पुस्तकांवर जास्त भिस्त ठेवणे आणि नियतकालिकांवडे दुर्लक्ष करणे ही आपल्या विद्वानांची प्रवृत्ती दिसते. मला असे वाटते की या प्रवृत्तीचे बीज आपल्या विद्यार्थीदशेतल्या आणि सामान्य सुशिक्षिताच्या वाचनाच्या सवयींमध्ये आढळावे. गाइडे वाचून किंवा गैरमार्ग वापरून पार होणाऱ्या परीक्षार्थ्यांचा किंवा केवळ मुसा-वाङ्मय वाचणाऱ्या किंवा काहीच न वाचणाऱ्या अर्धशिक्षितांचा विचार या ठिकाणी आपण सोडून देऊ—ज्यांना वाचनाच्या बऱ्यापैकी सवयी आहेत त्या आजी आणि माजी विद्यार्थ्यांचे काय ?

या वाचकवर्गातील लोक काय वाचतात ? ते मुख्यतः वर्तमानपत्रे, त्यांच्या साप्ताहिक पुरवण्या, आणि केव्हातरी पुस्तके वाचतात. नियतकालिक (मासिक, त्रैमासिक, षाण्मासिक, वार्षिक) हा एक महत्त्वाचा दुवा माहिती आणि ज्ञान यांच्या प्रसाराच्या साखळीमध्ये आहे याचे भानच आजच्या मराठी वाचकाला नाही असे खेदाने म्हणावे लागते.

(महाराष्ट्राबाहेरची परिस्थिती यापेक्षा फारशी बरी नाही, असली तर वाईटच आहे. अपवाद असलाच तर तो केरळ आणि बंगाल यांचा आहे असे माझे धावते अवलोकन आहे. बहुधा ते बरोबर असावे.)

महाविद्यालयात विशेष प्रावीण्याच्या विषयाचा पदवीपूर्व अभ्यास करताना, फार काय नंतर पदव्युत्तर अभ्यास करताना कितीसे विद्यार्थी पाठ्यपुस्तकांच्या पलीकडे जाऊन नियतकालिकांतील लेखांकडे वळतात ? कितीसे प्राध्यापक विद्यार्थ्यांची त्या विषयातल्या महत्त्वाच्या नियतकालिकांशी गाठ घालून देतात ? आज ज्ञान गतिमान झाले आहे. ते पुस्तकापर्यंत पोचते तोपर्यंत ते थोडेसे निवून थंडच झालेले असते. झाडाची वाढ झाडावरच्या कोवळ्या पर्णकळ्यांमध्ये दिसून येते त्याचप्रमाणे ज्ञानाची कणाकणाने होणारी वाढ, त्याचा जीवनरस नियतकालिकांमधल्या लेखात दिसतो, पुस्तकांत नाही, आणि पाठ्यपुस्तकांत तर नाहीच नाही याची जाणीव कितीशा विद्यापीठीय पाठ्यक्रममंडळांना असते ?

एखाद्या लेखकाच्या लेखांचा पहिला लेखसंग्रह पुस्तकरूपाने बाहेर पडेपर्यंत त्याच्या विचारांची दखलही आपल्याकडे पुष्कळदा घेतली जात नाही. एखादा लेखक तीन चारच मौलिक लेख लिहून थांबेल अशी शक्यता आपण लक्षात घेत नाही. (पिष्टपेषण करणाऱ्या लेखांचे भरताड करून पुस्तक बाहेर काढण्यापेक्षा मोजकेच मौलिक लेख लिहिण्यात एक शान आहे याची जाणीव आपल्या लेखकांत होणे या परिस्थितीमुळे दूर राहते.) सुट्या मौलिक लेखांचा संग्रह आणि संकलनाच्या स्वरूपाचा संपूर्ण ग्रंथ यात पहिल्याचे महत्त्व कितीतरी अधिक आहे याची जाणीव ज्यांना जाणते म्हणावे त्यांनाही पुष्कळदा नसते.

आपले पूर्वज दुसऱ्याने सांगितलेले समजावून सांगण्याकरता लिहिलेले व्याख्यान

ग्रंथ किंवा सारग्रंथ एका बाजूला आणि स्वतःची भूमिका मांडण्यासाठी लिहिलेले भाष्यग्रंथ किंवा प्रक्रियाग्रंथ दुसऱ्या बाजूला अशी स्पष्ट विभागणी करीत असत. ही विभागणी केव्हा धूसर झाली, पतंजली किंवा नागेश किंवा अभिनवगुप्त बाजूला पडून भट्टोजी दीक्षित किंवा मम्मट यांच्यापुरतेच वाचन केव्हा मर्यादित राहू लागले याचा शोध पोथ्यांची आणि संदर्भ-निर्देशांची खानेसुमारी घेऊन कुणा ग्रंथपालाने घेतला तर भारतामधील ज्ञानगंगा केव्हा कुंठित झाली याचा पत्ता लागेल.

आपले वाचन जोपर्यंत वर्तमानपत्रे आणि पाठ्यपुस्तके एवढ्यापुरतेच मर्यादित राहील, नियतकालिकांपर्यंत ते पोचणार नाही तोपर्यंत ही ज्ञानगंगा अशीच कुंठित राहणार. संस्कृत भाषेची जागा इंग्लिश भाषेने घेतली यामुळे फारसा फरक पडलेला नाही; ज्ञानाच्या खिडक्या उघडल्या, पण ज्ञानाचे डोळे मिटलेलेच राहिले आहेत.

**अशोक रा. केळकर**



अनुक्रमणिका

# बायकांची भाषा

## द. पां. खांबेटे

" अहोऽ ! "

" काऽऽय ? "

त्या हिचा पत्ता ठाऊक आहे का तुम्हाला ? "

कुणाचा पत्ता ? "

" आपल्या त्या हिचाऽ ! तीनदां विचारलं मी मघांपासून ! "

" तीनदा नाही, सतरांदा विचारलंस तरी ' हिचा ' म्हणजे कुणाचा, हे तू स्पष्ट सांगितल्याशिवाय कुणाचा पत्ता सांगू ? "

" हेच्च ते ! सगळं अगदी साग्रसंगीत स्पष्ट सांगितल्याशिवाय ध्यानातच येत नाही तुमच्या कधी ! आजचंच बघा ना ! आज संध्याकाळी खरं म्हटलं म्हणजे, मंदाकडे चहाला जायला नको होतं आपण ! मी सांगत होते तुम्हाला तसं; पण तुमच्या लक्षात येईल तर ना ! "

" म्हणजे ? केवढ्या अगत्याने त्यांनी बोलावलं होतं आपल्याला ! मला दुपारी मुकुंदाचा फोन आला ऑफिसांत. तुला मंदानं वेगळा फोन केला. अशी दोनदोन बोलावणी त्यांनी केल्यानंतरही आपण जायला का नको होतं ? "

" कारण अगदी साधं आहे. आपण आज त्यांच्याकडे जावं असं मंदाला खरोखर वाटत नव्हतं मनांतून ! "

" ऑं ? हे काही नवलच ऐकतो आहे मी ! कशावरून म्हणतेस तू हे ? "

" सांगते. आज दुपारी मला मंदाने फोन केला त्या वेळी ती म्हणाली, ' अग, आज संध्याकाळी तुम्ही दोघं चहाला या आमच्याकडे. ' इतकं म्हणून ती थांबली. मग थोड्या वेळानं म्हणाली, ' याल ना ? ह्यांचा अगदी आग्रह आहे तुम्ही यावंच म्हणून. ' ती मधेच थांबली तेव्हाच माझ्या ध्यानात आलं होतं, की तिचं आमंत्रण मनापासून नव्हतं ! तिचे पुढचे शब्द ऐकल्यावर तर माझी पक्की खात्रीच झाली ! मी काहीतरी सबब सांगून आम्हाला यायचं जमायचं नाही म्हणून म्हणणार, इतक्यात मंदाच्या हातून रिसीव्हर घेऊन मुकुंदभावजी मोठ्यानं म्हणाले, ' हे बघ बनूताई ! सबबी काही सांगू नकोस ! मी भाऊला पण ऑफिसांत फोन केला होता. त्यानं यायचं कबूल केलं आहे. सहाला या. आम्ही वाट बघतो. ' इतकं म्हणून त्यांनी फोन बंदच केला. मला काही बोलूंच दिलं नाही ! तुम्ही येडचाप आणि मुकुंदभावजी पण

तसलेच ! ”

“ हे बघ ! माझी बुद्धि जरा मंद आहे असं समज ! अजून माझ्या डोक्यात काही प्रकाश पडाला नाही ! तेव्हां तूं आपला एकेक मुद्दा जरा समजावून दे. ‘ आमच्याकडे चहाला या ’ एवढं म्हणून मंदा क्षणभर थांबली आणि तेवढ्यावरून तिचं आमंत्रण मनापासून नव्हतं, हे तू ओळखलंस ! ते कसं ? ”

“ ते असंऽ की मी बाई आहे नि मला बायकांची भाषा समजते ! ”

“ म्हणजेऽ ? ”

“ अहो, मंदाला जर आम्ही यावं असा खरा उल्हास असता, तर पहिलं वाक्य बोलून ती थांबली नसती ! आम्ही चहाला केव्हा यायचं, ती चहाबरोबर काय काय करणार आहे, तिनं आणखी कुणाकुणाला बोलावलं आहे, तिनं नवी पातळं कोणती घेतली आहेत, ती मला दाखवायसाठी तिनं कशी ठेवली आहेत, अशा अनेक गोष्टी तिनं मला भराभर एकामागून एक सांगितल्या असत्या ! असलं काहीच ती बोलली नाहीऽ—”

“ अस्सं ! म्हणजे ती काय बोलली यापेक्षा ती काय बोलली नाही, यावरून तू तिचं मन ओळखलंस ? ”

“ हो ! आणि पुढच्या वाक्यावरून माझी खात्री झाली. ‘ ह्यांचा ’ आग्रह आहे असं म्हणाली ती ! म्हणजे केवळ नवऱ्याचा आग्रह पडला म्हणून ती आपल्याला बोलावीत होती, स्वतः होऊन नव्हे ! ”

“ हां ! हां ! तूं काढलेला श्लेष मोठा मार्मिक आहे, यांत शंकाच नाही ! पण काय ग, आपण जाऊन काय मंदाचं घोडं मारणार होतो, की ज्यामुळं आपल्याला बोलावायची तिची अनिच्छा असावी ? उलट आपल्याशिवाय तिनं आणखी रमाबाईंना बोलावलं होतं, तारिणीला बोलावलं होतंऽ—”

“ अहो म्हणूनच ! त्यांना बोलावलं होतं म्हणूनच आज आपण तिथं यावं असं तिला वाटत नव्हतं ! रमाबाईंना तिथं पाहिल्याबरोबर माझ्या हे ध्यानात आलं ! म्हणून मी तुम्हांलाहळूच म्हणाले देखील की, ‘ तुम्ही आम्हां बायकांशी फारशा गप्पा मारू नका; मुकुंदभावजींशीच बुद्धिबळं वगैरे खेळत बसा. ’ पण ता म्हणजे ताकभात एवढं ओळखायला तुम्हांला कधी कुणी शिकवलं असेल तर ना ! ”

“ बाप रे ! हे रहस्य अधिकाधिकच गूढ बनत चाललं ! ”

“ काही रहस्य नाही नि काही गूढ नाही. परवाच मी तुम्हांला म्हटलं होतं की, रमाबाई यंदा महिलामंडळाच्या अध्यक्ष झाल्या आहेत नि मंडळाची नवी चिटणीस नेमायची आहे ! ”

“ बरं मग ? ”

“ मंदाला मंडळाच्या कामाची हौस आहे नि तिच्या मनातून चिटणीस व्हायचं

आहे. पण ते आहे रमाबाईंच्या हाती. चार दिवसांपूर्वी ती रमाबाईंना म्हणाली होती की, 'एकदा आमच्या घरी या. ह्यांची पण ओळख करून देते.' त्याप्रमाणं तिनं आज रमाबाईंना बोलावलं होतं. नवरा एकटाच घरी असता तर त्याला कशात तरी गुंतवून ठेवून तिनं रमाबाईंकडे चिटणीसपदाचा विषय काढला असता. आज त्यांना खूष करून तिनं आपला हेतू साधला असता! तारिणीवर रमाबाईंची मर्जी आहे, म्हणून मंदानं तिलाही बोलावलं. पण मंदा त्यांना चहाला बोलावणार असं कळल्या-बरोबर जसं काही मुकुंदभावजींच्या अंगांत वारं संचारलं नि त्यांनी आपल्यालाही बोलावून ठेवलं!"

"मुकुंदाला कशाला उगाच दोष देतेस? मंदाचा एवढा गुप्त बेत होता तर तिनं मुकुंदाला म्हणायचं की भाऊंना आणि बनीला आज बोलावूया नको!"

"अस्सं! आणि मुकुंदभावजींनी ते ऐकलं असतं? तुम्ही ऐकता? एखादी गोष्ट 'आज नको' असं कधी मी म्हटलं, तर 'आपल्या बायकोला पण काही शहाणपण आहे. काहीतरी विचारानंच ती असं म्हणाली असेल!' हे कधीतरी तुमच्या डोक्यात येतं का? पृथ्वी कशी निर्माण झाली इथपासून चालू क्षणापर्यंतचा सबंध इतिहास तुम्हाला सांगावा लागतो! म्हणजे एखादवेळ तुमच्या डोक्यात प्रकाश पडला तर पडतो! आपण त्यांच्या एवढ्या घरोब्याची, मग आपण चहाला का नको?—हे मुकुंदभावजींनी पुन्हापुन्हा खोदूनखोदून विचारलं असतं आणि मंदाला सळो की पळो करून सोडलं असतं!"

"पण मी म्हणतो, एवढा गुप्त बेत ठेवायचं कारणच काय मुळात? रमाबाईंना आपण का बोलावतो आहोत, हे सगळं मंदानं सांगितलं असतं मुकुंदाला, तर काय मोठं आकाश कोसळणार होतं?"

"होयच!"

"ते कसं काय?"

"वास्तविक तुमच्याच हे ध्यानात यायला हवं! एवढीशी गोष्ट असली तरी तुम्ही तिच्यासाठी माझ्याबरोबर तासन् तास वाद घालीत बसता! मंदानं जर मुकुंदभावजींना आपला खरा हेतु सांगितला असता, तर ते तटकन् म्हणाले असते, 'मंडळाच्या चिटणिसाची जागा ती काय, नि त्यासाठी कशाला हवी एवढी खुशामत नि वशिले बाजी? हूं:!' आणि त्यानंतर 'मंदा वशिल्यानं चिटणीस झाली, स्वतःच्या गुणांवर नव्हे!' ही गोष्ट पुढं दर वेळी त्यांनी उगाळली असती नि मंदाला हिणवलं असतं!"

"कोणत्या दर वेळी?"

"भांडणाच्या दर वेळी! तुम्ही तेच करता! जरा कधी आपला कशाबद्दल वाद झाला, तर लगेच तुम्ही दहाबारा वर्षांपूर्वीच्या उखाळ्यापाखाळ्या काढायला सुरुवात करता—"

" साफ खोटं आहे हे ! "

" मुळीच खोटं नाही ! खरं तेच बोलतेय मी ! "

" अग, खरं असेल कसं हे येडे ? आपलं लग्न होऊनच मुळी वर्षे झाली अवघी पाच ! त्यापूर्वी तुला काळी का गोरी मी बघितलीही नव्हती ! मग अशा स्थितीत दहादहा वर्षांपूर्वीच्या उखाळयापाखाळ्या मी काढणारच कसा ? "

" वितंडवाद घालू नका उगीच ! जिथंतिथं हीच संवय नडते तुमची ! आज मंदाकडे गेल्यावर मी तुम्हांला चांगली सूचना दिली होती की फारसं बोलू नका म्हणून ! पण नवरा बायकोचं ऐकेल तर येडचाप कसा ठरेल ? मंदाचा सगळा बेत तुम्ही आज उधळून लावलात ! आता रमाबाई अध्यक्ष असेपर्यंत मंदा काही मंडळाची चिटणीस होत नाही ! "

" बाप रे ! हा माझ्यावर भलताच गहजब आहे ! मी काय बाबा असं बोललो की ज्यामुळं मंदाचा सगळा डाव कोलमडला ? "

" नाही ना आलं लक्षात ? रमाबाईंची ओळख करून दिल्यावरोबर लगेच तुम्ही नक्को होता तोच विषय काढलात ! महिला-संघटनांचं आजचं कार्य कसं केवळ दिखाऊ आहे आणि त्यात काय सुधारणा केल्या पाहिजेत, या विषयावर तुम्ही आपली चर्पटपंजरी सुरू केलीत-- "

" उगाच भलते शब्द वापरू नकोस ! मी काही नुसती चर्पटपंजरी चालवली नव्हती. मी काही मुद्दे सांगत होतो नि रमाबाई पण त्यांच्यावर चांगली चर्चा करीत होत्या. "

" होय ! काही वेळ ! पण नंतर त्या कंटाळल्याच होत्या. त्यातून तुम्ही जेव्हा गमतीच्या म्हणून काही गोष्टी सांगायला सुरुवात केलीत, तेव्हा तर अगदी हद्दच झाली ! एका राणीच्या अध्यक्षतेखाली एका कवीचा सन्मान झाला; त्या वेळी ती राणी शेक्सपियरचं थडगं आपण अमेरिकेच्या दौऱ्यात कसं पाहिलं, हे वर्णन करू लागली, हे आज तिथं सांगायचं काय नडलं होतं ? "

" अग, पण खरी आहे ती गोष्ट ! आणि हसण्यासारखी आहे, म्हणून सांगितली मी ! त्यानं काय बिघडलं ? "

" आणखी काय बिघडायचं ? ती राणी या रमाबाईंची लहानपणापासूनची मैत्रीण आहे ! "

" अरेच्चा ! ती नव्हती मला कल्पना ! "

" ही नसेल एक कल्पना ! पण जी कल्पना तुमच्या मनात ठसवायचा मी प्रयत्न केला, ती तरी कुठं उचललीत ? मंदा तुम्हाला उघडउघड सूचना देत होती, ती तरी कुठं ऐकलीत ? "

" छे ग ! उगाच काय ? मंदानं मला कसलीच सूचना दिली नाही ! दिली असती

तर मी काय मुद्दाम असा वागलो असतो ? ”

“ कमाल झाली हो तुमच्यापुढं ! अहो, सगळीजणं जमताक्षणीच मंदानं परस्परांची ओळख करून दिली. चहापाणी लगेच केलं. आणि नंतर ती तुम्हांला म्हणाली, ‘ भाऊ ! तुम्ही वाटलं तर यांच्याशी बुद्धिबळं खेळत बसा ! आम्ही आपल्या बसतो आत गप्पा मारीत. म्हणजे तुमच्या खेळांत आमचीही कटकट व्हायची नाही !’ पण मुकुंदभावजींनी आणि तुम्ही अगदी हट्ट धरल्यागत करून आम्हांला बसवून घेतलंत ! ”

“ म्हणजेऽ ? आम्हांला कटकट होईल म्हणून मंदा तुम्हांला आत घेऊन निघाली होती. तसं नव्हतं म्हणून आम्ही तुम्हांला बसवून घेतलं—”

“ हेच ते ! बायकांची भाषा तुम्हांला काऽही कळत नाहीऽ म्हणून मी म्हणते ना त्याचं हे उदाहरण ! तुमची दोघांची कटकट नको, हा मंदाचा बोलण्याचा खरा अर्थ होता !

“ आपल्या नाही बुवा हे लक्षात आलं ! तुम्हा बायकांसारखे तेढे अर्थ काढायची आम्हांला नाही सवय ! पण काय ग. मी तुला असं विचारतो, महिला-समाजाच्या कामावर मी टीका केली, रमाबाईची मैत्रीण ती राणी, तिची मी थट्टा केली, म्हणून फार तर रमाबाई माझ्यावर चिडतील, पण मंदावर त्यांनी रागवायचं काय कारण ? ‘ मंदा आता काही चिटणीस होत नाही ’ असं तू म्हणालीस ते का ? ”

“ कारण रमाबाईना नक्की वाटलं की, तुम्हांला पुढं करून मंदानं आपली थट्टा फजिती करायची संधी साधली ! ”

“ कशावरून तूं म्हणतेस हे ? जाताना तर रमाबाई मंदाची स्तुती करून हास्यविनोद करून गेल्या ! ”

“ अय्या ! म्हणजे जाताना ज्या कचाकच चकमकी उडाल्या, त्या तुमच्या डोक्यावरूनच का गेल्या ? ”

“ कचाकच चकमकी ? त्या कशा ? ”

“ हु हुः हुः ! रमाबाईंनी पहिला घाव तर तुमच्यावरच घातला होता ! ”

“ माझ्यावर ? ”

“ हो ! तुमच्यावर ! जाताना त्या तुम्हाला काय म्हणाल्या ते आठवा—”

“ माझ्या लक्षात आहे—रमाबाई हसून म्हणाल्या होत्या की, ‘ भाऊराव तुम्हांला आमच्या मंडळात एकदा व्याख्यानाला बोलावलं पाहिजे. तुम्ही बोलण्यात मोटे पटाईत आहात—’ यावर मी एकदम म्हटलं होतं, ‘ हो ! येईन की ! ’ यात घाव कसला आहे ? ”

“ अहो, यात नाही ! पुढच्या वाक्यात आहे ! रमाबाई पुढं म्हणाल्या होत्या की, ‘ तुम्ही बोलत होता ना भाऊराव, त्या वेळी मला साऽरखी माझ्या एका चुलत

आतेदिराची—विनायकाची—आठवण येत होती! तोही असाच हुषार! अगदी तुमच्यासारखा!' एवढं म्हणून त्या हसल्या होत्या खुदखुद करून!"

"मग?"

"त्यांचा चुलत आतेदीर विनायक हा कोण, हे तुम्हांला ठाऊक आहे का?"

"नाही! कोण?"

"विनायक भुरके!"

"विनायक भुरके? नाव तर ओळखीचं वाटतं! हांऽ! वि-ना-य-क भु-र-के! बँकेत हजारो रुपयांची अफरातफर केलेला नि आता वेड्याच्या इस्पितळात आहे तो ऽ?"

"तोच! तोच रमाबाईंचा चुलत आतेदीर!"

"अग सटवे ऽ!"

"इश्श! माझ्यावर कशाला ओरडता उगीच?"

"अग, तुझ्यावर नाही ओरडलो मी! त्या रमाबाईला उद्देशून ओरडलो! त्या विनायकसारखा मी तिला दिसलो काय? आणि काय ग, तिचा हा गलिच्छ टोमणा तुझ्या ध्यानात आला होता ना?"

"होयच! मला समजते बायकांची भाषा!"

"आणि तरीही तू तिच्याचसारखी माझी निंदा केलीस! तिनं मला विनायक-सारखा हुषार म्हटलं, त्यावर तू म्हणालीस की, 'छेऽ! हे कसले हुषार! केवळ बोबडं बोलत नाहीत, एवढंच!' हे शोभलं ना तुला?"

"येडचाप आहात! हुः हुः हुः! अहोऽ! तो मर्मभेदक फटका रमाबाईंनाच होता! माझ्या नवऱ्याला कुणी नावं ठेवलेली मी बरी ऐकून घेईन?"

"म्हणजेऽ?"

"अहो, रमाबाईंचा नवरा बोबडा आहे! त्याला र आणि ल म्हणता येत नाही! मंडळातून रमाबाईंना घरी घेऊन जायला तो केव्हा केव्हा मोटार घेऊन येतो. त्याला पाहिलं की मंडळातल्या तरुण पोरी एकमेकींशी कुजबुजतात—'आया हो, मोटाय घेऊन यमाबाईचा नवया!' तेव्हा मी जे म्हटलं की, 'हे कसले हुशार! केवळ बोबडं बोलत नाहीत एवढंच!' ते रमाबाईंना बरोब्बर लागलं!"

"बापरे! म्हणजे तुम्हा बायकांच्या भाषेत अशी नकळत घुसणारी वाघनखं लपलेली असतात म्हणायची! मग मंदाची त्यांनी स्तुती केली तीदेखील खोटीच होती की काय?"

"अर्थातच!"

"असं? पण मला वाटलं नाही तसं! रमाबाई मंदाला म्हणाल्या होत्या, 'बाकी मंदाताई, तुमचं घर मात्र अगदी स्वच्छ नि सुरेख आहे हो! प्रत्येक वस्तू कशी

टापटिपीनं जागच्या जागी ठेवलेली ! नाही तर या तारिणीचं घर बघा ! सगळीभर पसारा इथूनतिथून ! ' यांत मंदाची स्तुतीच आहे ! दोष असला तर तारिणीला आहे ! "

" नव्हेऽ ! मंदावर हल्ला चढवायला तारिणीची मदत घेतली आहे ! कारण रमाबाईंच्या शब्दांवर तारिणी पटकन् म्हणाली, ' मुलाबाळांच्या घरात व्हायचाच पसारा ! सतरांदा खोली झाडून नीट लावली तरी माझी पाठ फिरल्याबरोबर पाच मिनिटांच्या आत मुलं धुडगूस घालून केरकचरा पाडून ठेवतात ! ' त्यावर रमाबाई उद्गारल्या होत्या, ' हां ! तेही खरंच ! आता तुझा तिसरा मुलगा केवढा आहे ग तारिणी ? ' तारिणी म्हणाली होती, ' आठ महिन्यांचा आहे. दोन महिन्यांपूर्वीच ' गुटगुटीत बालक स्पर्धेत ' त्याला बक्षीस मिळालं होतं ! इतका बांड झाला आहेऽ! नक्कोसा जीव करून टाकतो आपल्या खोड्यांनी ! ' त्यावर रमाबाई हसून म्हणाल्या होत्या, ' अग, यालाही भाग्य लागतं ! सर्वांच्याच नशिबी कुठं असतं ते ? ' मला इतका राग आला होता त्या दोघींचा ! मंदा बिचारी रडवेली मुद्रा करून गप्प उभी होती ! "

" पण काऽ ? मला उमज पडला नाही अजून ! "

" इतके कसे तुम्ही अगदीच हे ऽ ? अहो, मंदाला मूल नाही म्हणून ती बिचारी झुरते आहे ! तारिणीचं नि मंदाचं लग्न झालं एकाच वर्षी. पण तारिणीला तीन मुलं झाली तरी मंदाकडे अजून पाळणा हलला नाही ! तेव्हा तिला टोचून बोलून हिणवायची संधी घेतली दोघींनी ! "

" छेः छेः छेः छेः ! अरे, काय जहरी दुष्टपणा भरलेला असतो तुमच्या हसतमुख बोलण्यातसुद्धा ! आम्हांला नाही समजत तुमची भाषा हेच चांगलं आहे ! या चकमकीतून तू मात्र सुटलीस ! "

" कुठंऽ ? आपल्या मुलाचं कौतुक करायला मिळून मंदाचं नाक ठेचायला मिळालं यामुळं तारिणी एकदम भुरकाटली होती ! तिनं त्या भरात मलाही फटका द्यायचा प्रयत्न केला ! पण मी आहे खमकी ! मी बरी ऐकून घेईन ! "

" हं हं ? पण तुला कुठं काय म्हणाली तारिणी ? तुझ्या पातळाची उलट तिनं प्रशंसा केली होती. मला आठवतात तिचे शब्द—' वने ! हे लाडू-किनार मोतिया रंगाचं पातळ शोभून दिसतं तुला ! उलट त्या दिवशी तू मोरपिशी पातळ नेसली होतीस—ईऽ ! रंग शोभेसा तरी निवडावा !' यावर तू हसून म्हणाली होतीस, ' हो ग खरंच आहे तुझं म्हणणं ! तुला मात्र सगळे रंग शोभतात हो तारिणी ! आमची मावशी पण अशीच आहे तुझ्यासारखी ! ती काहीऽ नेसली तरी भारदस्त दिसते ! ' यात चकमक कुठं आहे ? "

" हुः हुः हुः ! नाही ना कळलं तुम्हाला ! काळ्या माणसाला मोरपिशी रंगाचं

पातळ बरं दिसत नाही ! मी काळी आहे ना ? तेव्हा माझा तो उणेपणा काढला तारिणीनं ! ''

" अच्छा ? आणि तुझ्या शब्दांचा अर्थ ? "

" उघड आहे ! माझी मावशी आहे पंचावन्न वर्षांची ! "

" अस्सं ! म्हणजे तारिणी कुठलाही रंग नेसेना ! ती म्हातारीसारखी भारदस्त दिसणार ! हाः हाः हाः ! भयंकर असली तरी अभ्यास करण्यासारखी आहे तुमची भाषा ! "

" काऽही उपयोग नाही ! जन्मभर शिकलात तरी पुरुषांना आमची बायकांची भाषा कधी समजायची नाही ! बरं, ते राहू दे ! मला पत्ता सांगता ना त्या हिचा ? "

" आली आपली कथा मूळपदावर ! ' त्या हिचा ' म्हणजे कुणाचा ? "

" अहो अनीता मराठेचा ! इतकं कसं लक्षात येत नाही तुमच्या ? "

" कसं येईल ? तुझ्या मनात कुणाचं नाव आहे, हे समजायला काय मी मनकवडा आहे ? "

" न समजायला काय झालं ? गतवर्षी पण मी तिचाच पत्ता तुम्हांला विचारला होता ! तिला हळदीकुंकवाला बोलावणं धाडणार आहे मी कार्ड लिहिलंयसुद्धा. पण तिचा पत्ता मेला आठवतच नाही मला ! "

" आण ते कार्ड इकडे. मी लिहितो पत्ता त्याच्यावर. "

असे म्हणून सौभाग्यवतीकडून मी ते कार्ड घेतले आणि त्यावर अनीताचा पत्ता लिहिला. कार्ड परत तिच्याकडे देत मी म्हटले, " पण काय ग, अनीताकडे चार दिवसांपूर्वी हळदीकुंकू होतं, त्या वेळी तू गेली नव्हतीस—"

" मुद्दामच नाही गेले ! मुलखाची जहांबाज आहे मेली ! "

" ऑं ? इतका जर राग आहे तुझा तिच्यावर, तर तिला आमंत्रण तरी कशाला पाठवायचं ? आणि ती जर जहांबाज असेल तर ती येईल तरी कशाला ? "

" हेच ते तुम्हां पुरुषांना कळत नाही ! तिचं आमंत्रण आलं होतं ना ? मग आपल्यालाही आमंत्रण पाठवायला हवं ! आणि जहांबाज असली तरी ती येईल नक्की ! "

" कशावरून ? "

" अहो, आपण हा तीन खोल्यांचा ब्लॉक घेतल्यानंतर दोनतीनदा ती मंदाला रस्त्यात भेटली होती. त्या वेळी ती आपल्या जागेची अगदी खोदून चौकशी करीत होती आमची नवी जागा कशी काय आहे हे पाहायची तिला मोठी उत्सुकता असणार. तेव्हा त्यासाठी तरी ती आल्याशिवाय राहणार नाही ! "

" अस्सं ! आणि समजा ती आली नि तुला म्हणाली की, ' बघ ! मी तुझ्याकडे आले हळदीकुंकवाला. पण तू काही आमच्याकडे आली नव्हतीस ! ' तर तू काय

उत्तर देशील ?"

"हुः हुः हुः ! तसं तिनं म्हणावंच ! तिनं असं विचारलं तर काय उत्तर द्यायचं ते मी योजून ठेवलंय मनाशी !"

"होय ? काय ते ?"

"मी तिला सांगणार आहे, 'अग, माझी प्रकृती ठीक नसते आताशी ! त्यात या तीन खोल्यांच्या हवेशीर जागेची नि विजेच्या पंख्याची सवय झाल्यापासनं, कोंदट जागेत मी पांच मिनिट जरी बसले तरी माझा जीव घाबराघुबरा होतो ! म्हणून यायचा आळस केला हो तुमच्याकडे !' आणि हे उत्तर दिल्यावर तिचा चेहरा कसा होतो हे पाहणार आहे मी निरखून !"

"शीः शीः ! कशाला इतकं कुजकं बोलायला हवं ? अनीता दोन खोल्यांच्या जागेत राहते आणि तू तीन खोल्यांच्या ब्लॉकमध्ये राहतेस, हे इतकं टिच्चून तिच्या ध्यानात आणून द्यायचं काय कारण ? गतवर्षापर्यंत तूही दोन खोल्यांच्या जागेतच एका कोंदट चाळीत राहत होतीस—"

"म्हणूनच तर ! अहो, गतवर्षी मी तिच्याकडे हळदीकुंकवाला गेले होते, तेव्हा तिनं मला कसं हिणवलं होतं, तुम्हांला ठाऊक आहे का ? मी तिला आपलं सहज म्हटलं, 'अनीता ! अग, किती दिवसात तू आमच्याकडे फिरकली नाहीस हल्ली ! ये ना ग सहज कधीतरी बसायला अशी !' तर त्यावर ती ढालगज भवानी काय म्हणाली, माहीत आहे ? म्हणते कशी,—'बने ! तुझ्या चाळीचा रस्ता नाही बाई माझ्या ध्यानात रहात ! मी कुठे बाहेर गेले तर टॅक्सीशिवाय नाही बाई कधी फिरत ! आणि तुमची ती अंधारी चाळ तर कुठं अगदी आंतल्या बाजूला आहे ! टॅक्सी तिथपर्यंत येतच नाही नि दूर टॅक्सीतून उतरल्यावर तिकडं कसं यायचं हे माझ्या ध्यानांत येत नाही !' तिचं हे बोलणं ऐकून जमलेल्या बायका माझ्याकडे बघून फिदी-फिदी हसल्या होत्या. त्याचा सूड उगवणार आहे मी या खेपेला !"

"अस्सं ! हळदीकुंकवाचा समारंभ करण्यामागं असे कट असतात तर तुम्हा बायकांचे ! एकंदर किती कार्डं झाली आमंत्रणांची ?"

"आज लिहून पाठवायची बहात्तर नि दोन दिवसांनी टाकायची सात !"

"दोन दिवसांनी ? पण दोन दिवसांनीच तर हळदीकुंकू आहे ना ? मग ही सात कार्डं त्या बायांना पोचणार केव्हा नि त्या येणार केव्हा ?"

"अहो, त्या बाया येऊ नयेत म्हणून तर ही कार्डं उशिरा टाकायची ! इतकं कसं तुम्हांला कळत नाही ?"

"कळत नाही खरंच ! त्या बाया हळदीकुंकवाला येऊ नयेत अशी जर तुझी इच्छा आहे, तर मग आमंत्रणं तरी निष्कारण पाठवायची कशाला ती ?"

"कारण त्यांच्याकडून दरवर्षी न चुकता अशीच आमंत्रणं येतात म्हणून !

त्यांतल्या पाच बायांची आमंत्रणं मला नेहमीच उशिरा येतात ! म्हणून मीही त्यांना उशिरा पोचावीत अशा बेतानंच कार्डं धाडते ! आणि दोन बाया मला आवडत नाहीत—एक ती भीमाकाकू—अतिशय डौली आहे ती बाई ! आपले श्रीमंत यजमान, आपली गोंडस मुलं, आपले नवे दागदागिने, आपली किंमतवान पातळं यांचा डौल सारखा बडाबडा बोलून दाखवण्याखेरीज तिला दुसरा विषयच नसतो मला तर तिच्या त्या वटवटीचा अगदी वीट येतो म्हणून मला ती इथं यायला नको. आणि दुसरी काशीताई. ती एक नंबरची निंदक ! तोंडावर गोडगोड बोलेल आणि पाठी मागून निंदा नि कुचेष्टा करीत फिरेल ! ”

“ असं ? पण काय ग, काशीबाई निंदक म्हणून तिला बोलवायचं नाही म्हणतेस, पण तू केलेल्या आमंत्रणाच्या यादीत, झावबाच्या वाडीतल्या गोदूबाईचं नाव आहे. ती तर साऱ्या गावाच्या कुटाळक्या करणारी म्हणून प्रसिद्ध आहे ! तिला कशाला बोलावतेस मग ? ”

“ हुः हुः हुः ! तिच्याकडून मला थोडी माहिती काढायची आहे. ती राहते त्याच चाळीत थोरल्या जाऊबाईंचं माहेर आहे—”

“ बरं मग ? ”

“ जाऊबाईंच्या धाकट्या बहिणीनं चाळीतल्याच एका परजातीच्या बेकार मुलाशी प्रेमविवाह ठरवला असल्याचं कळलंय मला ! दोघांच्या अगदी गुप्त आणाभाका झाल्यायत म्हणे ! गोदूबाई हळदीकुंकवाला आली म्हणजे तिच्याकडून याची खडान् खडा बातमी मिळेल मला ! ”

“ शीः ! तुला तिच्याकडून हव्यात कशाला या नसत्या चौकशा ? ती करील प्रेम-विवाह, नाही तर नाही करणार ! तुला त्यात पडायचं कारण ? ”

“ मोठं कारण आहे ! दोन वर्षामागं माझ्या भाचीनं—सुमीनं—प्रेमविवाह केला तेव्हा आमच्या थोरल्या जाऊबाईंनी किती नावं टेवली होती त्याला ! म्हणे यांच्या घरातल्या माणसांना असले थेर परवडतात तरी कसे ? तरी बरंऽ ! सुमीनं लग्न ठरवलं ते आपल्याच जातीतल्या मुलाशी. चांगला प्रोफेसर आहे तो. परजातीतल्या नि कामधंदा नसलेल्या भुक्कड बेकारावर नव्हती ती भाळली ! गोदूबाईकडून सारी माहिती नीट काढून, मग ती आमच्या जाऊबाईंना हसत हसत चांगली ऐकवणार आहे ! मग बघेन त्यांचा नक्षा कसा टिकतो तो ! पुढच्या आठवड्यात नाही तरी अनिलच्या तिसऱ्या वाढदिवसासाठी जाऊबाईंच्याकडे जाण्चं आहेच आपल्याला ! ”

“ बाप रे ! त्या वेळी भांडण उकरून काढणार तू ? ”

“ काऽही घाबरू नका ! भांडण कशाला करायला हवं ? आज मंदाकडे काय आम्ही भांडलो ? हसत—खेळतच बोललो. पण काढले की नाही चांगले वाभाडे ! तस्संच तिथं बोलेन ! अनिलच्या वाढदिवसाच्या वेळी भांडण उकरून काढायला मी

काय वेडीखुळी आहे ! आणि खरंच ! सगळंच मुसळ केरात ! तुम्हाला एक गोष्ट मुद्दाम सांगायची ठरवली होती मी ! ''

" काय ती ? "

" चार दिवसांनी बावीस तारखेला माझा वाढदिवस येतो, त्या वेळी तुम्ही यंदा माझ्यासाठी काही उगाच खर्च करू नका हं गतवर्षासारखा ! "

वास्तविक तिचा वाढदिवस मी विसरलोच होतो. पण तिने हे बजावल्यानंतर मी म्हटले, " वा ग ! मी बावीस तारीख पक्की लक्षात ठेवली होती. तुला आधी काही न सांगता, अवचित प्रेझेंट आणायचा नि तुला चकित करायचा माझा बेत होता. "

" कशाला हो ? सगळयाच बाजूंनी खर्च वाढले आहेत कोण ! गतवर्षी तुम्ही मला पासष्ट रुपयांची कुडी आणलीत ! दरवर्षी कशाला हवाय माझ्यासाठी इतका खर्च ? "

यावर मी काही म्हणणार, इतक्यात तिचे लक्ष घड्याळाकडे जाऊन ती उद्‌गारली " अगोबाई ! अकरा वाजून गेले ! केवढ्यात रात्र झाली एवढी, कळलंही नाही बोलताबोलता ! "

हळदीकुंकू थाटात पार पडले. सौ. च्या वाढदिवसाला काही भेट नको म्हणून तिनेच बजावून सांगितले असल्यामुळे, मी प्रेझेंट पाहण्याच्या नादात पडलो नाही. त्या दिवशी आम्ही एका हिंदी सिनेमाला गेलो होतो. निघेपर्यंत सौ. मजेत होती. निघताना मी म्हटले, " सिनेमाला जाऊ. बाहेरच कुठंतरी झक्क जेवण घेऊ. नाही तरी तू नको म्हटल्यामुळं मी प्रेझेंट आणलेलं नाही. तेव्हा मजेखातर थोडा खर्च करायला हरकत नाही. "

पण सिनेमाला जाताना ती वाटेत माझ्यापाशी फारशी बोलली नाही. सिनेमातले नट-नटी तिला नेहमी आवडणाऱ्यांपैकीच होते. सिनेमाही बरा होता. पण त्या दिवशी सिनेमाचे कथानक, गाणी, नाच, अभिनय यांपैकी तिला काही काही आवडले नाही, ' कुठल्या भुक्कड सिनेमाला घेऊन आलात ? ' म्हणून तिने मला नावे ठेवली !

दुसऱ्या दिवशी तसेच. जितक्यास तितके बोलत होती. माझ्या मनात आले की, वाढदिवसाची भेट मी आणली नाही म्हणून ती रागावली की काय ? मी तिला स्पष्ट तसे विचारले. त्यावर ती हसल्यासारखे करून म्हणाली,

" उगाच तुमचे तर्क-वितर्क ! काही आणू नका म्हणून मीच नव्हतं का तुम्हाला सांगितलं ? तेव्हा तुम्ही कशाला काही आणाल ? आता परवा जाऊबाईंकडे अनिलचा वाढदिवस आहे त्याच्यासाठी खेळणं वगैरे घ्यायला तुम्ही करालच बीस-पंचवीस रुपयांचा खर्च ! "

मी चकित झालो ! वीसपंचवीस रुपयांचे खेळणे कशाला ? आमच्या नितिनच्या वाढदिवस झाला, त्या वेळी त्यांनी दोन रुपयांचे खेळणे आणले होते. मग आम्ही

कशाला एवढा खर्च करायचा ? पण मी सौभाग्यवतीकडे हे बोललो नाही. वाटले की कदाचित तिला आपल्या जाऊबाईंना दिपवून टाकायचे असेल.

त्या दिवशी मी खेळणे विकत घेऊन परस्पर ऑफिसातून अनिलच्या वाढदिवसाकरता यायचे असे ठरवले होते. मी सौभाग्यवतीला खूष करण्यासाठी बरोबर वीस रुपयांचे, किल्लीचे, मान डोलावीत चालणारे एक अस्वल विकत घेतले. अनिल ते बघून अगदी खूष झाला वहिनींना खूप आश्चर्य वाटल्यासारखे दिसले.

घरी परत येताना सौभाग्यवतीने मला म्हटले, "केवढ्याचं होतं ते अस्वल ?"

"वीस रुपयांचं."

"अस्सं !"

"छान होतं की नाही ?"

"सुरेख होतं ! अस्संच करावं !"

बस्स् ! 'अस्संच करावं !' या विलक्षण वाक्यानंतर गेल्या चार दिवसांत सौभाग्यवती माझ्याशी एक चकार शब्द बोललेली नाही ! काऽय या बायकांचे असते, देव जाणे ! मला तर या बायकांची भाषाही कळत नाही आणि त्यांचा अबोलाही समजत नाही !

**पूर्वप्रकाशन :** चिरस्मृत द. पा. खांबेटे, **पोटिमा** (ललित–लेखन–संग्रह), मुंबई मॅजेस्टिक बुकस्टॉल, १९६१, पृ. ११९–३३. (ज. ०५·०७·१९१२, मृ. ०६·०८. १९८३, विनोदी कथा, कथा, सत्यकथा, अध्यात्म अशा विविध स्वरूपाचे लेखन.)

---

**कानी पडलेला संवाद :**

एक बाई : रोजच बुधवारी मला तास असतो.

एक पुरुष : म्हणजे रोज का बुधवारी ?

दुसरी बाई : मला समजलं तिला काय म्हणायचंय ते. तिला म्हणायचंय दर बुधवारी.

तो पुरुष : मग तसं का नाही म्हणाली ती ?

दुसरी बाई : आमची बायकांची भाषा तशीच असते !

---



अनुक्रमणिका

# डॉ. केतकरांचे भाषाविषयक विचार

गं. ना. जोगळेकर

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांना रूढ अर्थाने भाषावैज्ञानिक म्हणता येत नाही. त्यांनी कारणपरत्वे भाषाविषयक काही विचार मांडले आहेत. त्यांतील काही विचार केवळ प्रासंगिक स्वरूपाचे असले तरी अनेक विचार आजही लक्षात घेण्यासारखे आहेत.

**महाराष्ट्रीय ज्ञानकोशा** मध्ये (तेवीस भाग, पुणे १९२०–२७) अनेक ठिकाणी भाषेसंबंधीच्या नोंदी आल्या आहेत. प्रस्तावना खंडाच्या ५ व्या भागात भारतीयांच्या प्राचीन काळातील व्याकरण–शास्त्राच्या अभ्यासाबद्दल व वैयाकरण, परंपरेबद्दल विवेचन आले आहे. त्यात तैत्तिरीय संहिता, प्रातिशाख्ये, ब्राह्मणादी ग्रंथ, पाणिनीची अष्टाध्यायी, पतंजलीचे महाभाष्य, सिद्धान्तकौमुदी, शब्दानुशासन असे अनेक विषय आले आहेत. अर्वाचीन व्याकरणसंप्रदाय, भाषाशास्त्राचा युरोपातील अभ्यास, तौलनिक भाषाशास्त्र, मराठीतील भाषाशास्त्रविषयक प्रयत्न, आणि वि. का. राजवाडे यांचे ग्रंथ यासंबंधी या भागात माहिती मिळते. प्रस्तावना खंडाच्या पहिल्या भागात भारतीय भाषा, भाषावंशांची यादी, आर्य संस्कृती आणि भारतीय भाषा, संस्कृत भाषेची तीन स्वरूपे या नोंदी आल्या आहेत; तर शरीरखंडाच्या १८ व्या भागात भाषाशास्त्र, भाषेचा ऐतिहासिक अभ्यास, भाषाभ्यासाची अंगे, भाषोत्पत्ती, भाषांचा तुलनात्मक अभ्यास, भाषांचे गट या विषयांचे विवेचन आले आहे. याशिवाय २३ व्या 'हिंदुस्थान' या खंडात भारतातल्या विविध भाषांची माहिती संकलित करण्यात आली आहे. तेव्हा प्राचीन भारतीय भाषाभ्यास परंपरा व आधुनिक युरोपीय भाषा विचार या विषयांना आवश्यक तेवढे स्थान डॉ. केतकरांनी दिलेले दिसते.

ज्ञानकोशाचे मुख्य संपादक म्हणून अंतिम जबाबदारी केतकरांची असली, तरी या भाषाविषयक नोंदी त्यांच्या हातच्या आहेत असे वाटत नाही. विशिष्ट ज्ञानशाखांच्या नोंदी ज्या खास व्यक्तींकडून करून घेण्यात आल्या आहेत तेथे त्या त्या व्यक्तींचा स्वतंत्र निर्देश आहे. "असा खास निर्देश नसेल तर तो मजकूर संपादक मंडळाने तयार केला आहे असे समजावे" अशी ज्ञानकोशकारांनी सूचनाही दिली आहे. ज्ञान-कोशातील भाषाविषयक नोंदींसंबंधी कोणाही विशिष्ट व्यक्तीचा निर्देश नाही. तेव्हा या

नोंदी संपादक मंडळाने केल्या हे उघड आहे. या संपादक-मंडळात य. रा. दाते व चिं ग. कर्वे यांचा प्रामुख्याने समावेश असल्यामुळे या नोंदींचे कर्तृत्व या दोघांचेच असावे असे वाटते. कारण याच दोघांनी पुढाकार घेऊन ज्ञानकोशाच्या पाठोपाठ 'महाराष्ट्र-शब्दकोश' सिद्ध केला आहे. या शब्दकोशाच्या पहिल्या सहा भागांना भाषाविषयक विस्तृत प्रस्तावना जोडल्या असून 'महाराष्ट्र भाषाभ्यास' या नावाने या सर्व प्रस्तावनांचे संकलित पुस्तकही प्रसिद्ध करण्यात आले होते. ज्ञानकोशातील विवेचन व 'महाराष्ट्र-भाषाभ्यास' मधील विवेचन यांतील संबंध अतिनिकटचा आहे. तेव्हा ज्ञानकोशातील भाषाविषयक नोंदींचे कर्तृत्व दाते-कर्वे यांच्याकडेच जाते.

नाहीं म्हणायला, वि. का. राजवाड्यांच्या भाषाविषयक कार्याबद्दल जे प्रशंसोद्गार ज्ञानकोशात काढले गेले आहेत, ते केतकरांचे असण्याची शक्यता आहे. कारण राज-वाड्यांच्या निधनानंतर **विद्यासेवक** मासिकातील मृत्युलेखात (३:११, जुलै १९२७) राजवाडे हे प्रथमतः भाषाभ्यासक व वाङ्मयसंशोधक होते व नंतर इतिहास-संशोधक अशी केतकरांनी क्रमवारी लावली आहे. ज्ञानकोशातील राजवाडे कार्याची प्रशंसा पाहता हा मजकूर केतकरांच्या हातचा वाटतो. पण एकंदरीने केतकरांचा ज्ञानकोशाखेरीजचाच भाषाविचार पाहिला पाहिजे.

**विद्यासेवक** मासिकातली काही तुरळक टिपणे सोडली, तर केतकरांनी दोन वेग-वेगळ्या भाषणांच्या रूपाने आपली भाषाविषयक मते मांडली असे म्हणता येईल. (महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण या त्यांच्या १९२८ मधल्या पुस्तकात अल्प प्रमाणात भाषेसंबंधी विवेचन येते, पण ते विखुरलेल्या स्वरूपात आहे.) १९२७ साली पुण्यात भरलेल्या शारदोपासक संमेलनाचे ते अध्यक्ष होते. या अध्यक्षपदावरून त्यांनी केलेले भाषण ('मागणी तसा पुरवठा' हे त्याचे शीर्षक) **'शारदा-विहार'** या पुस्तकात (महाराष्ट्र शारदा मंदिर, पुणे १९४०) समाविष्ट आहे. १९३१ साली हैदराबाद येथे भरलेल्या १७ व्या मराठी साहित्य संमेलनाचे डॉ. केतकर अध्यक्ष होते. त्यांचे हे अध्यक्षीय भाषण **'मराठी साहित्य संमेलन : अध्यक्षीय भाषणे'** (खंड पहिला : संपा. भीमराव कुलकर्णी, म. सा. परिषद प्रकाशन, पुणे) या संपादित ग्रंथामुळे आज उपलब्ध आहे.

केतकरांनी ही दोन्ही भाषणे विशिष्ट परिस्थितीत केली असल्यामुळे त्यात भाषाविषयक विचाराला प्राधान्य मिळालेले दिसते. १९२६ मधे झालेल्या पहिल्या शारदोपासक संमे-लनाचे अध्यक्ष इतिहासाचार्य राजवाडे होते. त्यांनी आपल्या भाषणात मराठी भाषा मुमूर्षु (मरणाची इच्छा करणारी म्ह. मरू घातलेली, मरण पंथाला लागलेली) आहे असे भाकित करून ठेवले होते. केतकरांनी त्यामुळेच १९२७ च्या भाषणात राजवाड्यांच्या भाषणाच्या अनुरोधाने आपली मते मांडली आहेत. त्यांचे मुख्य प्रतिपाद्य असे आहे :

भाषेचाच उत्कर्षापकर्ष पहावयाचा झाल्यास ती भाषा ज्या लोकांची आहे त्या

लोकांच्याच उत्कर्षापकर्षाकडे लक्ष दिले पाहिजे. मराठी राज्यात मराठी भाषेची जी स्थिती होती ती स्थिती आपल्या उरावर दुसरे लोक बसले असता कशी राहणार ? आपल्या उरावर मात्र दुसऱ्या लोकांस बसू द्यावयाचे आणि आपल्या भाषेचाच तेवढा उत्कर्ष साधावयाचा हे कसे होईल ? " राजवाडे यांच्या भाषणामुळे जर कोणाची अशी समजूत झाली असेल की, भाषा खरोखरच लयास जाईल तर ती समजूत मात्र चुकीची ठरेल. भाषा एकाएकी मरत नाही. ती सहज मरत असती तर अनेक सामाजिक प्रश्न फार सोपे होऊन गेले असते...जेव्हा भाषा नष्ट होत नाही तेव्हा त्या लोकांची सामाजिक स्थिती अशी होते की, त्या लोकांतील सुशिक्षित व पुढारलेला वर्ग आपल्या राष्ट्रीय कक्षेतून सुटून जेत्याच्या भाषेचे शिक्षण घेतो व त्याच्या कक्षेत शिरतो. आणि सामान्य जनतेची संस्कृती कनिष्ठ होत जाते...साधारणपणे असे दिसते की, ज्या लोकांत अनागर वर्ग बराच आहे त्यांची भाषा नष्ट होणार नाही, भ्रष्ट होईल... भाषा भावरूप किंवा गहन कल्पना व्यक्त करण्यास दुर्बल झाली म्हणजे ती बोलणाऱ्या लोकांस कोणत्याच प्रकारची प्रगती प्राप्त होणे शक्य नाही....सामान्य जनता परकीय भाषा कधीच शिकू शकत नाही. त्यामुळे सामान्य जनतेचे महत्त्व राजकारणात जसजसे वाढू लागते तसतसे देशी भाषेचेही महत्त्व राजकारणात वाढू लागते. कारकुनी नोकरीपलीकडे न पाहणारा मध्यम वर्ग स्वभाषेशी बेइमान होणे शक्य असते. ही गोष्ट मी काल्पनिक सांगत नाही ज्ञानकोश मंडळासाठी सहानुभूती उत्पन्न करण्याकरिता मी प्रवास करीत असता मराठीचे बल वाढविणे म्हणजे इंग्रजीचा पगडा कमी करायचा प्रयत्न आहे व ही गोष्ट राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीने घातुक आहे असे म्हणणारे महाराष्ट्रातील कित्येक अत्यंत प्रसिद्ध गृहस्थ मला भेटले...एखाद्याने एखाद्या गहन विषयावर नवीन शोध लावला आणि तो शोध त्यास लेखरूपाने प्रसिद्ध करावयाचा आहे तर या प्रसंगी शोधाच्या सत्याचे महत्त्व आहे; शोध कोणत्या भाषेत लिहिला याचे महत्त्व कमी आहे... समाजातील शास्त्र व विद्या यांच्या पाठीमागे लागलेला वर्ग हा भाषेचा अभिमानी राहीलच असे नाही व भाषेचा विकास त्या वर्गाकडून अशाच वेळेस होईल की, जेव्हा सामान्य जनता अगोदरचा विकास करून पुढील विकास त्यास करावयास लावील. भाषाविकास अर्थात सामान्य जनतेच्या मागणीवर अवलंबून आहे."

शारदोपासक संमेलनाच्या या भाषणाच्या उत्तरार्धात केतकरांनी वाङ्मयविषयक प्रश्नांची चर्चा केली असून ' मागणी तसा पुरवठा ' या तत्त्वाचा उच्चार त्या संदर्भात केला आहे. वाङ्मयाच्या विकासासाठी 'महत्त्वाकांक्षामूलक साहसाची ' आवश्यकता आहे इकडेही लोकांचे लक्ष वेधले आहे.

केतकरांच्या या भाषणाचा काही भाग राजवाड्यांच्या भाषणाच्या प्रतिक्रियेसारखा असला तरी त्यातून काही महत्त्वाचा सिद्धांत मांडण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. कुणी केवळ तसे भाकीत केल्याने भाषा नष्ट होणार नाही हे केतकरांचे म्हणणे स्वीकारावे

लागतेच; पण सामान्य माणूस आणि भाषा यांच्या संबंधाची त्यांनी केलेली चर्चा अधिक मूलगामी असल्याचे जाणवते. कारकुनी मध्यमवर्गाच्या भाषिक मनोवृत्तीबद्दलचे केतकरांचे निदान आजही अनुभवास येणारे आहे. मात्र सामान्य माणूस देखील आज स्वातंत्र्याच्या काळात परभाषेच्या प्रभावक्षेत्राखाली अधिक प्रमाणात येऊ लागला आहे ही स्थिती केतकरांच्या सिद्धांताला विरोधी अशी आहे.

केतकरांनी हैदराबादच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणातही भाषाविचारच प्रामुख्याने आला आहे याला कारण विशिष्ट परिस्थिती हेच आहे. हिंदुमहासभेच्या भागानगरच्या लढ्याचे ते दिवस होते. केतकर हिंदुसभावादी नसले तरी हिंदुत्ववादी होतेच. हैदराबादच्या निजामाने हिंदु प्रजाजनांवर जो जुलूम चालविला होता, त्याचे एक रूप भाषिकही होते. निजामाच्या राज्यात उर्दू हीच राज्यकारभाराची, शिक्षणाची, आणि जनसंपर्काची भाषा होती. निजामाची बहुसंख्य प्रजा तेलुगू, मराठी आणि कन्नड या भाषा बोलणारी असली तरी उर्दूचे सार्वत्रिक वर्चस्व या भिन्न भाषिकांना स्वीकारावे लागत होते. अनेक मराठी वृत्तपत्रे निजामाच्या प्रदेशात आणायला बंदी होती. **निजामविजय** सारखे मराठी साप्ताहिक निजामाच्या कृपेने प्रसिद्ध होत असे. निजामाच्या दडपशाहीविरुद्ध तिथल्या हिंदू प्रजेने जो लढा चालविला होता त्याचे एक अंग भाषिकही होते. हैदराबादच्या मराठी भाषिकांनी मोठ्या चिकाटीने भरविलेल्या या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. केतकर या वेळी काय बोलतील याबद्दल सर्वांना उत्सुकता होती. केतकरांनी तिथल्या प्रजेची बाजू ठामपणे मांडली. त्यांच्या भाषणाचा अर्धाअधिक भाग निजामाला उद्देशूनच आहे. केतकरांची या भाषणातली मुख्ये विधाने अशी :

"कोणत्याही राजसत्तेला लोकांची भाषा बदलता येणार नाही. लोकभाषेचे स्वरूप सत्ता बदलली असता थोडेसे बदलेल, पण तिचे मूळ स्वरूप नष्ट होणार नाही. राजाला त्याची स्वतःची अशी कोणतीच भाषा असू शकत नाही. जी प्रजेची भाषा तीच त्याची भाषा.... एका भाषेला चिरडून टाकून तेथे दुसरी भाषा स्थापन करावी अशी भावना राजाची नसते, तर विशिष्ट भाषेच्या कारकुनांची असते .. मुसलमानी धर्म आणि उर्दू भाषा यांचा संबंध मुळीच नाही. 'ईश्वर अनन्य आहे आणि महमंद हा त्यांचा प्रवक्ता आहे.' हे म्हणण्याचा अरबी बोलणाऱ्याला जेवढा हक्क आहे तितकाच मराठी बोलणाऱ्याला किंवा तेलुगू बोलणाऱ्याला हक्क आहे.... सामान्य जनांस द्रव्य पाहिजे, पोटाला पाहिजे, भाषाविकास ते मागत नाहीत असे म्हणणारे हे विसरतात की भाषाविकासाशिवाय द्रव्योत्पादन जोराने सुरू होणार नाही. भाषाविकासावर पुढील गोष्टी अवलंबून आहेत : १ वर्तमानपत्राचा धंदा, २ मुद्रणाचा धंदा ३ पोस्टखात्याची व तारखात्याची वाढ, ४ पोस्टामार्फत विक्री, ५ पत्रव्यवहार, जाहिरातप्रसार यांच्या योगाने माल खपून जे मोठ्या प्रमाणावर उत्पादन होणे शक्य आहे ते उत्पादन.

हे प्रत्यक्ष धंदे झाले; पण भाषाविकासाचे इतर व्यापक परिणाम होऊन प्रत्येक धंद्याची कर्तृत्व–शक्ती त्याच्या योगाने वाढते. उदाहरणार्थ : ६. गुंतागुंतीचे विचार एकमेकांस कळविणे ७. एकदा केलेला विचार फुकट जाऊ नये म्हणून नोंद करून ठेवणे, ८. कारखाने चालविण्यासारख्या क्रियांना अवश्य लागणाऱ्या अनुभवांची नोंद करून ठेवणे.

यांसारख्या क्रियांचा विकास भाषा विकास झाल्याशिवाय होत नाही....... उर्दूचा अपकर्ष व्हावा अशी माझी इच्छा नाही, तर कोणतीही भाषा दुसऱ्यावर लादण्याच्या मी विरुद्ध आहे. मराठी भाषा जर दुसऱ्या लोकांवर लादली जाणार असेल तर मी त्या योजनेस देखील विरोधच करीन. जगात कोणतेही राज्य म्हणजे त्यातील लोक, सरकारी भाषा आणि लोकभाषा यांत द्वैत राहिल्यास उत्कर्ष पावत नाही.....भाषायंत्र वापरणे म्हणजे आपल्या मनातील अव्यक्त विचार व्यक्त करणे होय. ही क्रिया कठीण आहे आणि त्यामुळेच तत्त्ववेत्ते, कवी आणि असंदिग्ध शब्दांनी आपले निर्णय देणारे न्यायाधीश यांना प्रामुख्य असते.

## भाषा–विकासासाठी कार्यक्रम

१. भाषेची जोपासना करण्यासाठी जे कार्यकारी मंडळ असेल ते होता होईतो अगदी स्वतंत्र मनुष्यांचे असावे म्हणजे सरकारी नोकर त्यात नसावेत, आणि सरकार-कडून प्रतियोगाची भूक असलेले लोकही त्यात नसावेत.

२. ...एकंदर महाराष्ट्रीय समाजाची निरक्षरता काढून टाकण्याचा प्रयत्न जोराने करावा, आणि प्रत्येक डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या पाठीमागे शिक्षण वाढविण्यासाठी लागावे.

३. भाषेत राज्यव्यवहार जास्त वाढावा म्हणून सरकारच्या पाठीमागे लागावे आणि सरकारचे जेथे जेथे भाषेला अपकर्षक धोरण असेल तेथे तेथे कायदे कौन्सिलच्या सभासदांमार्फत योग्य कारवाई करावी.

४. निरनिराळ्या भाषांच्या अभिमान्यांनी एकमेकांच्या भाषांच्या विकासाला विरोध करू नये, उलट मदत करावी. म्हणून प्रत्येक भाषेच्या साहित्यसंमेलनाच्या चालकांशी विचारविनिमय करून सामान्य धोरण निर्माण करावे. सर्व भाषांनी आपापल्या प्रदेशात आलेल्या परस्थलीय लोकांच्या विषयी काय धोरण ठेवावे हे देखील सर्वांच्या मताने ठरवावे व यासाठी अखिल भारतीय देशभाषा परिषद निर्माण करावी.

५. जेव्हा प्रत्येक राजकीय पक्षाची परिषद असेल तेथे देशभाषा विकास विषयक धोरण तुम्ही काय ठेवाल हे प्रत्येक राजकीय परिषदेस विचारावे..."

केतकरांच्या या भाषणात भाषा आणि वाङ्मय यांच्या विकासाच्या विषयाखेरीज साहित्य संमेलन व साहित्य परिषद यांच्या परस्पर संबंधाविषयीही विस्ताराने विवेचन केले आहे कारण या दोहोंच्या अधिकार-कक्षेसंबंधी त्या वेळी बरेच वादंग निर्माण झाले होते.

स्वराज्य प्राप्ती, संस्थानांचे विलीनीकरण, आणि देशभाषांचा शासनात थोडाबहुत स्वीकार या दृष्टीने तेव्हाच्या व आताच्या भाषिक स्थितीत फरक पडला असला तरी उर्दू व मुसलमान यांचा परस्पर संबंध, भिन्न भाषांचे आपापसांतील झगडे यांसारखे अनेक प्रश्न आजही तसेच टिकून आहेत. केतकरांना अभिप्रेत असलेला भाषाविकासाचा कार्यक्रम हाती घेण्याची तळमळ ही सर्व पातळ्यांवर अत्यल्पच दिसते असे म्हणावे लागते.

मराठी विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४

## बौद्धिक स्वातंत्र्य आणि स्वभाषा

महाराष्ट्रीय ज्ञानकोश हा महाराष्ट्राचे बौद्धिक स्वातंत्र्य स्थापन करण्यासाठी झालेला प्रयत्न होय...मनुष्य स्वतःच्या विचारापेक्षा परक्याच्या मतास अधिक मान देतो तेव्हा त्यास बौद्धिक परावलंबित्व...म्हटलेच पाहिजे. तथापि....तज्ज्ञाकडे जाणे...हे बौद्धिक परावलंबित्व [ आपणास ] वृद्धिंगत करावयाचे आहे...तज्ज्ञाच्या सल्ल्याने चालणे म्हणजे तज्ज्ञांकडून स्वतःस ठकवून घेणे मात्र नव्हे...पण एका राष्ट्रास दुसऱ्या राष्ट्रावर...[ असणारे ] बौद्धिक बाबतीत परावलंबन धोक्याचे व राष्ट्रास अत्यंत कमीपणा आणणारे आहे...वेदात काय आहे, हे आपण इंग्रजास अगर जर्मनास विचारावे... यासारखी खेदाची दुसरी कोणती गोष्ट आहे बरे?...संस्कृत ग्रंथांची भाषांतरे... हिंदुस्थानातील कोणत्याही भाषात ( पुरेशी ) झाली नाहीत!...पाश्चात्त्य देशात सामान्य ठिकाणी जशी ग्रंथालये आहेत, तशी मुंबईस किंवा कलकत्त्यासही नाहीत....एकंदर ज्ञानक्षेत्राविषयी तर बोलावयासच नको...भौतिक शास्त्रे व तज्जन्य कला यांच्या बाबतीत तुलनाच हास्यास्पद होईल. आपले कर्तव्य आपली उच्चता परिश्रमाने स्थापित करण्याचे आहे, तुच्छता व्यक्त करण्याचे नाही. पाश्चात्त्यांचे संशोधन गोळा करावे, तपासून घ्यावे, ग्राह्य असेल ते घ्यावे, त्याज्य असेल ते टाकावे... पण हे सर्व कोणी करावे? गचाळपणा व इंग्रजी भाषा भारतीय तरुणांच्या घशात कोंबण्याची हाव ... ( यांनी युक्त अशा ) येथील युनिव्हर्सिट्यांकडून हे काम होईल अशी आशा वाटत नाही. पाश्चात्त्यांचे शिष्यत्व योग्य आहे पण ते जगातील चढाओढीत जय पावण्यासाठी आहे. पाश्चात्त्य पांडित्यामुळे घाबरून हतवीर्य होणे ( यासाठी नाही. ) ... ( हा सर्व विचार ) आम्ही ज्ञानकोश तयार करताना जागृत ( ठेवला होता. )

श्री. व्यं. केतकर, माझे बारा वर्षांचे काम ऊर्फ ज्ञानकोश मंडळाचा इतिहास, पुणे १९२७

# प्रमाणभाषेचे अध्यापन : काही विचार

दिलीप धोंडगे

शालेय शिक्षणात तीनही स्तरांवर पहिली भाषा म्हणून मातृभाषेचे अध्यापन ही अतिशय नाजूक बाब झाली आहे. त्यामुळे शिक्षण क्षेत्रात असंख्य भेडसावणारे प्रश्न निर्माण झाले आहेत. गळती, नापासीचे प्रमाण प्रचंड वाढले आहे. शिक्षण क्षेत्रातले हे ठळक अपयश आहे. ह्या अपयशाला भाषिक दृष्टिकोणविषयक अज्ञानच बहुतांश कारणीभूत आहे. वेनिक्स यांनी म्हटल्याप्रमाणे शिक्षणातील अपयश हे नेहमी भाषेतील अपयश असते. मात्र या साऱ्या अपयशाचे खापर भाषा-शिक्षकांवरच फुटावे असा ह्याचा मुळीच अर्थ होत नाही. याला सर्व विषयांचे शिक्षक जबाबदार आहेत. कारण प्रत्येक विषयाचा शिक्षक हा माध्यम भाषेला जबाबदार असतो. जॉर्ज सॅम्पसन हा इंग्लिश शिक्षणतज्ज्ञ म्हणतो : Every teacher is a teacher of English आपल्या परिस्थितीला अनुलक्षून आपण मराठीत शिकवणारा शिक्षक हा मराठीचाही शिक्षक असतो असे म्हणू या.[1] आमचे भाषेतर बहुतेक शिक्षक मात्र भाषेशी काहीही घेणेदेणे नसल्याचे सांगतात. इतकेच काय, तर इंग्रजी, हिंदीच्या अध्यापकांनाही. मराठीशी संबंध जोडण्याची गरज वाटत नाही. यात ध्यासाचा, व्यासंगाचा, नि टूमबाजीचा प्रकार किती हे आपण सहज ताडू शकतो. उलट, इयत्ता १ ते ७ च्या शासनमान्य अभ्यास क्रमात असे म्हटले आहे की "पाठ्यपुस्तकातील इतर विषयांचा अभ्यास मातृभाषेच्या माध्यमातून करीत असतानाच विद्यार्थी मातृभाषेचाही अभ्यास करीत असतात हे लक्षात असू द्यावे. म्हणून इतर विषयांचे अध्यापन मातृभाषेच्या अभ्यासास विरोधक न होता पोषक होईल अशी काळजी घ्यावी.[2] प्राथमिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमाची जी अपेक्षा, तीच इतरही दोन्ही स्तरांवरच्या अभ्यासक्रमाची असणार हे उघड आहे.

प्रस्तुत लेखातील विवेचन सोयीसाठी व ठळक उदाहरणांसाठी बागलाणातल्या अहिराणी बोलीचे उदाहरण घेऊन करण्याचे योजिले आहे. तसेच बहुतांश विवेचन हे प्राथमिक स्तरापुरतेच मर्यादित ठेवलेले आहे. असो. बागलाणात अहिराणी ही बोलीभाषा बोलली जाते. शालेय शिक्षणक्रमात मराठी ही प्रमाणभाषा शिकविली जाते. ही प्रमाण-भाषा अर्थातच प्रथम भाषा म्हणून शिकविली जाते. वस्तुतः अहिराणी ही मुलांची प्रथम भाषा ठरते. परंतु अहिराणी बोलणे हे अशिष्टपणाचे मानले जाते. बरेचसे तथा-कथित शिक्षणाचा ओढा असलेले अज्ञानी (अशिक्षित नव्हे!) पालक आपल्या

पोराबाळांना अहिराणी बोलू देत नाहीत. मराठीतूनच बोलावे असा आग्रह धरतात. बरेचसे शिक्षकही घरी मराठीतच बोलावे, मित्रांशी मराठीतच गप्पा माराव्यात असा अधिकारसिद्ध उपदेश करतात. मुलांना तर घरीदारी अहिराणीतून संज्ञापन ( coom unication ) केल्यावाचून गत्यंतर नाही. अशावेळी त्यांची अवस्था ना अल्याड ना पल्याड अशी होते. दुसरा एक विकृत परिणाम होतो. ज्यांच्या घरीदारी प्रमाण-भाषा मराठी बोलली जाते त्यांची मान उंचावते, छाती फुगते. ज्यांच्या घरी अहिराणी बोलली जाते त्यांची मान लवते, छाती बसते. नकळतपणे सांस्कृतिक स्तरीकरण होते. विद्यार्थ्यांमध्ये न्यूनगंड निर्माण होतो. उदासी येते. गळती-नापासीच्या रोगजंतूंना इथेच शिरकावाला जागा मिळते. तर वर लिहिलेले भाषा बोलण्यासंबंधीचे समज बरोबर की चुकीचे ह्याचा विचार केला पाहिजे. हा विचार मला वाटते, प्राथमिक शिक्षणातली बरीचशी काळोखी प्रकाशमान करू शकेल.

मी बागलाणातल्या अहिराणी ह्या बोलीभाषेचाच फक्त उल्लेख केला. परंतु महाराष्ट्रात जवळ जवळ सर्वच जिल्ह्यांत अशा निरनिराळ्या बोलीभाषा आहेत. डांगी, कोकणी, खानदेशी, घाटी, वऱ्हाडी इत्यादी. जेथे बोलीभाषा नसतील तेथे प्रमाण मराठी व त्या भागात बोलली जाणारी मराठी ह्यांत फरक आढळतील. मुंबईसारख्या संमिश्र संस्कृत्यांच्या व बहुभाषकांच्या वस्तीत तर हा प्रश्न साक्षात आहेच. विशेषतः झोपडपट्टी भागात तर अधिक आहे. एकाच वस्तीत सिंधी, गुजराती, कन्नड भाषक, तेलुगू भाषक अशी कुटुंबे राहातात. त्यांची मुले त्याच भागातल्या मराठी माध्यमाच्या महानगरपालिकेच्या शाळेत जातात. घरी आपली स्वभाषा बोलायची व शाळेत प्रमाण मराठीतून सारे शिकायचे अशी अवस्था; आणि अशी अवस्था सर्वत्र आहे.

यासाठी प्रमाणभाषा व बोलीभाषा यांच्या परस्पर संबंधाचा विचार केला पाहिजे. प्रमाण भाषेला जर आपण विशाल सागराची उपमा दिली तर त्याला विविध बोलींच्या नद्या येऊन मिळतात. ह्या बोली त्या सागराची सर्वांगीण परिमाणे वाढवीत असतात. दुसरे म्हणजे, कुठल्याही भाषेची एक अशी शब्दसिद्धीची प्रक्रिया असते. ह्यामध्ये तद्भव शब्द बऱ्याच प्रमाणात असतात. हे बहुतांश बोलीभाषेकडून घेतले जातात. बोलीभाषा प्रमाणभाषेकडून काही शब्द घेते. उच्चारदृष्ट्या, व्याकरणदृष्ट्या त्यात बदल होऊन तो निराळाच बोलीशब्द तयार होतो, त्या शब्दाला त्या भागातल्या विशिष्ट संस्कृतीची झाक मिळाली की तो खुलतो व प्रमाणभाषा मग त्याला चटकन उचलते. अशा प्रकारे हे आदानप्रदान अव्याहत चालू असते. भाषेतला प्रत्येक शब्द हा संस्कृती, परंपरा, चालीरीती ह्यांचे प्रक्षेपण करणारा एक चमकदार खडा असतो. असे खडे बोलीभाषांनीच पुरविलेले असतात. किंबहुना बरेचदा बोलीभाषाच पुरवू शकतात. त्याचप्रमाणे बोलीभाषा प्रतिमा-प्रतीकांनी चित्रमयी झालेली असते. कमीत कमी शब्दांत परिणामकारक बोलण्यातही बोलीभाषा बोलणारे वरचढ ठरतात. हा सर्व फायदा अखेर प्रमाण भाषेलाच मिळतो.

थोडक्यात, प्रमाणभाषा व बोलीभाषा ह्या परस्परोपजीवी असतात. त्यांच्यात परस्पर पोषक–पोष्य संबंध असतो. तसेच प्रमाणभाषा जशी स्वयंसिद्ध व व्यवस्थाबद्ध असते तशीच बोलीही असते असा सिद्धांत सोस्यूरनेही मांडला आहेच.

बोलीभाषा व प्रमाणभाषा यांचा हा असा परस्परसंबंध ध्यानात घेतला म्हणजे बोलीभाषा ह्या अशिष्ट भाषा आहेत, चुकून सुद्धा शिक्षकाने त्यांचा वापर कधी कुठे करायचा नाही, विद्यार्थ्यांनाही करू द्यायचा नाही हा गैरसमज लगेचच दूर पळून जाईल. उलट, भाषाशिक्षणाचे काम मुळात बोलभाषा आणि प्रमाणभाषा यांच्यात पूल बांधण्याचे असते. हा पूल दोन्ही टोके सांधण्यासाठी असतो. आणि प्रमाणभाषा शिकल्यानंतरही तो उडवून द्यायचा नसतो. प्रमाणभाषा ही बोलभाषेची जागा घेण्यासाठी शिकली जात नाही; तर योग्य सर्वसामान्य संदर्भात वापरता येण्यासाठीच शिकायची असते. घरी आपल्या परिचित वातावरणात विद्यार्थी त्याची नेहमीची खरी मातृभाषा वापरायला स्वतंत्र असतो. तो त्याचा खऱ्या अर्थाने जन्मसिद्ध हक्क असतो.[३] हा प्रथमदर्शनी भयानक वाटणारा विचार स्वीकारावा लागेल. त्याचप्रमाणे बोलभाषा वापरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या भाषिक सवयींचा, उच्चारांचा, शब्दसंग्रहाचा, काही अंशी वाक्यरचनेचाही अभ्यास करून त्याच्या अनुरोधाने त्याला प्रमाणभाषा शिकविताना काय काळजी घेतली पाहिजे, काय पद्धत वापरली पाहिजे, ते ठरवावे लागेल. काही प्रमाणात आणि काही विशिष्ट बोलींच्या बाबतीत अतिशय मोठ्या प्रमाणात, हे काम परभाषा शिकताना घ्यायच्या सावधगिरीचे आहे. अशा प्रकारची सावधगिरी घेण्याची जाणीव आणि पद्धत आपल्या शिक्षणक्रमात नसल्यामुळेच म्हणजेच विद्यार्थ्यांच्या जन्मजात भाषिक सवयींचा मुळीच विचार न करता प्रमाणभाषा दडपून शिकवली जात असल्यामुळे ही सूचना विचित्र व नवलाईची वाटते. पण शिक्षण जर निकोप करायचे असेल, त्याच्याबद्दल विशेषतः भाषाशिक्षणाबद्दल जर आत्मविश्वास आणि आवड उत्पन्न करायची असेल तर विद्यार्थ्यांच्या बोलभाषेकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.[४]

शालेय शिक्षणाच्या आरंभी शिक्षणाबद्दल आवड नि आत्मविश्वास निर्माण होणे हे अतिशय महत्त्वाचे आहे. प्रथम आवड निर्माण होणे हे तर अधिकच महत्त्वाचे आहे. विद्यार्थ्याला आवड निर्माण होण्यासाठी त्याची बोलीभाषा समजून घ्यावी लागेल. प्रसंगी तिचा अभ्यासही करावा लागेल तिचा आधार घेऊन मग त्याला प्रमाणभाषा शिकवावी लागेल. प्रमाणभाषा दडपून शिकविली तर भाषिक दुरावा निर्माण होईल. व कुठल्याही क्षणी व कोणत्याही परिस्थितीत हे घातक ठरेल. ह्या दुराव्यामुळे विद्यार्थ्याचे कोवळे मन भलतेच समज स्वतःवर कोरून घेईल. नंतर ते कोरीव समज मिटणे अशक्य ठरेल. प्रारंभावस्थेत नेहमी हीनत्वाचे विचार प्रबळ असतात. यामुळे न्यूनगंड निर्माण होऊन पलायनवृत्ती निर्माण होते. इथे गळती सुरू होते. समजा त्यांना मारून मुटकून

शाळेत बसविले तर त्यांना आपले काहीच वाटत नाही. वरं, भाषिक दारिद्र्याची भावना ही सांस्कृतिक दारिद्र्याची भावना निर्माण करते म्हणून त्याला परकेपणा वाटू लागतो. तो उदास होतो. उदासीनच आत्मविश्वास गमावून सुतकी चेहरा करून बसतो. त्याला कुठलाच विषय मग आकलन होत नाही व परीक्षांती तो नापास होतो.

शिक्षणात आवड व आकलन ह्यांचं महत्त्व अपरंपार आहे. आपल्या शिक्षणव्यवस्थेत ह्याचा जरी कटाक्षाने विचार झाला तरी बरेचसे प्रश्न चुटकीसरशी सुटतील. आवड निर्माण होण्यासाठी बोलीभाषांचा दैनंदिन अध्यापनात शिक्षकाने कुशलतेने वापर करावा हा मुद्दा एवढ्या चर्चेवरून स्पष्ट व्हावा. बागलाणातील आदिवासी भाग सोडला तर जवळजवळ ९० टक्के शाळा ह्या अहिराणी बोलीभाषक भागातल्या आहेत. आदिवासी भागात तर त्यांची स्वभाषा कोकणी[५], परिसरातल्या भागात अहिराणी व शाळेत प्रमाणभाषा मराठी; अशी उतरंड आहे. हे उंचवटे उतरून विद्यार्थी प्रमाण भाषेपाशी सुखरूप येण्याऐवजी तो कोकणीच्या उंचावरून सरळ कोसळतो नि गटांगळ्या खात प्रमाणभाषेपाशी लोळागोळा होऊन पडतो. असो. तर अहिराणी व प्रमाणभाषा मराठी ह्यांची टोके जोडण्याचे काम भाषाध्यापनात शिक्षकाला करावे लागेल. अलीकडे सुदैवाने, प्राथमिक शाळात तरी शिक्षक ज्या भागात काम करतात, त्या भागातलेच असतात. त्यामुळे हे काम फारसे अवघड ठरणार नाही. प्रसिद्ध भाषावैज्ञानिक डॉ. अशोक केळकर यांनीही हेच सुचविले आहे. प्राथमिक शाळेत तरी स्वभाषेला पर्याय नाही. आदिवासी मुलांना शिक्षण द्यायचे तर एकदम प्रादेशिक भाषेत डुब्या खायला लावण्यापेक्षा प्रारंभीची दोन तीन वर्षे तरी विद्यार्थ्यांच्या घरची भाषा आणि प्रादेशिक भाषा ह्या दोन्ही भाषा जाणणारे शिक्षक त्यांना मिळणे जरूर आहे.[६]

अध्यापनात बोलीभाषेचा कसा उपयोग करता येईल हे आपण प्रत्यक्ष उदाहरणां-नीच पाहू. या उच्चारदृष्ट्या विभिन्न पण अर्थदृष्ट्या समान असलेल्या शब्दांच्या जोड्या खाली देत आहे. डावीकडचे शब्द अहिराणीतले व उजवीकडचे प्रमाण मराठीतील आहेत.

इवळणे—विव्हळणे
कुशीत—कुत्सित
लामण—लांबण
निरग—निरोगी
व्हकारा—होकारा
मालन—माल्हन
वाहेल—वाह्यात

वरील जोड्यांत उच्चारदृष्ट्या असलेले भिन्नत्व फारसे आकलनापलीकडचे नाही. तरीही विद्यार्थ्यांना समजावून दिल्याशिवाय आकलन होणार नाही. उदा०

कुत्रं इवळस ( अहिराणी )

कुत्रे विव्हळते. ( प्रमाण मराठी )

कुठेही प्रमाण मराठीतले हे वाक्य आले तर विद्यार्थ्यांना सुबोध करण्यासाठी बोलीभाषेची मदत घेतल्याने फायद्याचे होईल; अन्यथा कैक स्पष्टीकरणे वाया जाऊन 'विव्हळणे' हा शब्द अगम्यच राहील. स्पष्टीकरणासाठी बोलीची मदत घेऊन जर म्हटले : एखाद्याने जर सोट्याने कुत्र्याला मारलं तर ते रडतं ना? (इथे कुत्र्याच्या पाठीत घातले वगैरे रचना तूर्तास कामाची नाही) मुले 'हो' म्हणतील. आपण त्याच्या रडण्याला काय म्हणतो माहीत आहे?

—कदाचित विद्यार्थी बोलणार नाहीत.

अरे ते मार बसल्यामुळे रडत रडत पळत जात नाही का? किंवा कधीकधी कुणी मारत नाही पण ते ओरडतं तर काय म्हणतो आपण?

—अजूनही बोलणार नाहीत.

मग शिक्षकानेच सांगावे— इवळणे म्हणतो ना! तेच हे विव्हळणे. दोन्ही एकच. विद्यार्थ्यांचे चेहरे उजळतील. मुलांचे चेहरे त्यांच्या निरागसतेमुळे लवकर लखाखतात. त्यांना अत्यानंद होईल व ह्या आनंदातच त्यांना स्वभाषा व शाळेतली भाषा ह्यांत काहीच फरक नाही असं वाटेल. बरे, प्राथमिक स्तरावरच हा फरक स्पष्ट केला तर उमगतो नाहीतर माध्यमिक व विद्यापीठीय स्तरावरही हे भेद अनाकलनीयच राहतात कारण मुलगा मग हळूहळू नाही म्हटले तरी बोलीभाषेबद्दल अनास्था बाळगू लागतो. अर्थात ह्यालाही भाषाविषयक गैरसमजच कारणीभूत आहेत. असा एक शब्दसमूह व त्यावर आधारित एक सबंध वाक्यरचना पाहू या :

सावरून बसणे ( प्रमाणभाषा )

वाक्य : सीता सावरून बसली.

सवरीसन बसणे ( अहिराणी )

वाक्य : सीता सवरी बसनी किंवा सीता सवरीसन बसनी. ह्या 'सवरीसन' बसण्याची शब्दसमूह उच्चारतानाच थोडी जरी कृती केली तरी विद्यार्थ्यांना सहज कळेल. सावरून व सवरीसनचा आणखी अन्य मार्गांनीही फरक स्पष्ट करता येईल. कुशल शिक्षक आणखी वेगळे उपायच योजू शकतील. वरील वाक्यरचनांमध्ये एक क्रियापद 'बसली' व दुसरे 'बसनी' आहे. ह्यात फारसा फरक आढळणार नाही. बरे, प्रमाणभाषेत जसे लिंगवचन पुरुषानुसार क्रियापद बदलते तसे इथेही बदलताना दिसेल :

उदा० सीता सावरून बसली – राम सावरून बसला.

सीता सवरी बसनी – राम सवरी बसना.

बोलीभाषक लोक हे प्रतिमाप्रतीकांतून बोलण्यात वरचढ असतात हे मी या आधी अन्यत्र नमूद केले आहेच. त्याची कारणे काहीही असतील; पण ही त्या भाषेची

व्यवस्था निश्चितच्च आहे. कदाचित अपुऱ्या शब्दसंग्रहामुळे, कदाचित फारसं बोलण्याचा सराव नि समय नसल्यामुळेही ते आपले म्हणणे कमीतकमी शब्दात प्रतिमाप्रतीकांतील भाषेत मांडायला शिकले असावेत. उदा० ' डोंगर बोडके झाले ' हे पटवताना एक स्त्री सांगत होती : " खालतून कुत्रं जर वर चढाले लागं तर ते टाळवन दखायी." म्हणजे " खालून जर डोंगरावर कुत्रं चढायला लागलं तर ते डोंगर चढताना शेंड्यापर्यंत स्पष्ट दिसेल." हे सांगताना ती सहज बोलून गेली. अहिराणीभाषक मंडळी नेहमी अशी प्रतिमाप्रतीके, म्हणी, उखाणे ह्यांचा बोलताना खच्चून वापर करतात. आणखी एक उदाहरण पाहू : तेथे कुणीदेखील नव्हते हे सांगताना एक मुलगा म्हणाला : तिठे एक पिच्चूसुद्धा नव्हतं. वरील वाक्यातील ' टाळवन ' व ह्या वाक्यातील ' पिच्चू ' हे शब्द स्पष्टीकरणातीत आहेत. व ह्या शब्दाचे रुपडेही काही न्यारेच वाटते. इथे शिक्षकाला त्या त्या भागातल्या लोकसाहित्याचा वापर करता येऊ शकेल. शिक्षक जर कल्पक नि कुशल असेल तर तो लोकसाहित्यातील भांडाराचा चपखल वापर करून विषय आकलन-सुलभ करील व गळतीनापासीचे प्रमाण बऱ्याच प्रमाणात थांबवील. सर्व विषयशिक्षकांनी असा प्रयत्न केला तर फारच मोठे यश पदरात पडेल. आता प्राथमिक शाळांकडे फक्त इयत्ता १ ते ४ पर्यंतचेच वर्ग आहेत. इयत्ता ५ ते ७ चे परिसरातल्या माध्यमिक शाळांना जोडले गेले आहेत. म्हणूनच मी सर्व विषय-शिक्षक असा उल्लेख केला. क्वचित ठिकाणी इ. १ ते ७ पर्यंतच्या प्राथमिक शाळा आहेत. पण हे विवेचन प्राधान्याने इ. १ ते ७ च्या प्राथमिक स्तराला धरून आहे. या निमित्ताने इ. १ ते ७ च्या अभ्यासक्रमात मातृभाषेच्या अध्यापनासंबंधी काय म्हटले ते पाहू या : प्राथमिक पातळीवर मातृभाषा शिकण्याचे हेतू स्थूलमानाने खाली दर्शविलेली कौशल्ये व क्षमता विकसित करणारे असावेत.

१. अर्थ समजून घेऊन ऐकायला शिकविणे.
२. आपले विचार, कल्पना, भाव इ. शुद्ध, स्पष्ट व योग्य रीतीने वाचेने व्यक्त करता येणे.
३. शुद्ध उच्चार, योग्य स्वराघात आणि योग्य अभिव्यक्ती यांचा मेळ साधून अस्खलित व प्रगटपणे वाचता येणे.
४. अर्थ समजून घेऊन मूकवाचन करायची सवय लावणे.
५. तर्कशुद्ध, परिणामकारक व शुद्ध भाषेत आपले विचार मांडता येणे.
६. सुवाच्य अक्षरात लिहिता येणे.
७. ही उद्दिष्टे साध्य होण्यासाठी खालील गोष्टींची जरुरी आहे.

( अ ) विद्यार्थ्यांना शब्दांचा अर्थ समजून त्यांचा उपयोग करता यावा आणि त्यांचा शब्दसंग्रह टप्प्याटप्प्याने वाढत राहावा. ( आ ) मातृभाषेच्या रचनेचे स्वरूप विद्यार्थ्यांना पुरेसे अवगत व्हावे आणि त्याच्या आधारावर त्यांना भाषेच्या वरच्या

दर्जाचा पुढील अभ्यास करता यावा आणि इतर भाषांचा अभ्यास करण्यासही त्याची मदत व्हावी. (ई) चांगली पुस्तके वाचण्याची आवड उत्पन्न व्हावी.[6]

वरील हेतूंमध्ये एक गोष्ट पुनःपुन्हा आवृत्त होताना दिसते व ती म्हणजे विद्यार्थ्यांची भाषिक क्षमता वाढली पाहिजे. शिक्षणाची सुरुवात ही त्याच्या बोलीपासून होते. ही बोली त्याची मातृभाषा असते. म्हणून बोली व प्रमाणभाषा यांच्या सहकार्यानेच त्याची भाषिक क्षमता विकसित होईल. बोलीचा सतत आग्रह धरण्याचे दुसरे एक कारण म्हणजे ह्या शैक्षणिक अवस्थेत विद्यार्थ्याला किती ज्ञान द्यायचे हा प्रश्न नाही. तर प्रश्न त्याच्यामध्ये ज्ञानार्जनाची ओढ कशी निर्माण होईल हा आहे. म्हणून ह्या अवस्थेत प्रत्यक्ष पद्धती, परिस्थितिनिष्ठ पद्धती आणि मौखिक पद्धती परिणामकारक ठरल्यावाचून राहणार नाहीत. शक्य असल्यास, शाळेच्या पहिल्या दोन वर्षांत द्वैभाषिक शिक्षण, संभाषण आणि गोष्टी सांगणे ह्या साधनांनी युक्त अशा मौखिक दृष्टिकोणावरच भर देण्यात यावा. पाठ्यपुस्तकांचा परिचय त्यानंतर करून द्यावा. किंवा प्राथमिक पहिल्या दोन वर्षांसाठी पाठ्यपुस्तके तयार करायची झाल्यास लोकसाहित्याचा कुशल वापर करून तयार करावीत. नंतरच्या वर्षांच्या पाठ्यपुस्तकातही लोकसाहित्याचा वापर अग्रहक्काने करावा.

अखेर पाठ्यपुस्तक हे साधन आहे, साध्य नव्हे. शिक्षक स्वतः हा या ठिकाणी महत्त्वाचा कार्यकारी घटक आहे. म्हणून शिक्षकावरच अनेक जबाबदाऱ्या येऊन पडतात. ह्या साऱ्या जबाबदाऱ्या पार पाडीत असतानाच शिक्षकाने एक जबाबदारी सावधानतेने पार पाडली पाहिजे. ती म्हणजे सोपे बोलण्याची. कारण काय की, आपल्याकडे चांगली भाषा बोलणं म्हणजे अवघड भाषा बोलणं हा गैरसमज पक्का झाला आहे. भाषेची श्रीमंती ही अगडबंब शब्दांनीच वाढते म्हणून सरसहा शब्दाच्या सोसाने तत्सम शब्दांचा संदर्भशून्य मारा केला जातो वस्तुतः भाषेतल्या शब्दांना निश्चित आणि काटेकोर अर्थ क्वचितच असतात. अर्थदृष्ट्या बहुतेक शब्द संदिग्ध असतात आणि एका विशिष्ट संदर्भात आल्यानंतरच ही संदिग्धता नाहीशी होऊन शब्दाचा अर्थ स्पष्ट होतो. नुसत्या सामान्य अर्थ दर्शविणाऱ्या शब्दांना केवळ शब्दकोशातच अस्तित्व असते. पण व्यवहारात म्हणजे भाषेच्या नैसर्गिक स्वरूपात मात्र, केवळ संदर्भयुक्त शब्दच सापडतात.[7] म्हणजे संदर्भानुसार विकारक्षमता हा भाषेचा महत्त्वाचा गुण आहे. यासाठी त्यांचा योग्य संदर्भात वापर केल्यानेच भाषा विनिमयसुलभ होईल. शब्दांच्या, शब्दसमूहाच्या वा वाक्प्रचाराच्या सोसासाठी केवळ ते वापरले गेले तर भिंतीवर गोवरी लिंपावी तसे ते विद्यार्थ्यांच्या मनावर लिंपले जातात व गोवरी जशी वाळली की आपोआप खाली पडते तसे शब्द, शब्दसमूह, वाक्प्रचार इ विसरले जातात. कुठलाही नवीन शब्द व इतर गोष्टी ह्या अशा रीतीने लिंपल्या न जाता मुरल्या जाव्यात म्हणजे त्यांचे सदासर्वकाळ भान राहाते. ह्या संदर्भात विज्ञानातल्या पारिभाषिक शब्दांचा उल्लेख करता येईल.

संस्कृताभिनिवेशामुळे भयानक पारिभाषिक शब्द निर्माण करून विद्यार्थ्यांच्या ग्रहण शक्तीला अक्षरशः बूचच बसविले आहे. माध्यमिक स्तरावरच्या मुलांना ते धड उच्चारता देखील येत नाहीत तर स्मरणात ठेवणे बाजूलाच. ह्यामुळे शब्दांच्या निस्संदर्भ व ढिसाळ उपयोगाला वाव मिळतो. उदा. वर्तमानपत्रात एका महाविद्यालयाची विद्यार्थ्यांना प्रवेश **उपलब्ध** अशी जाहिरात होती. माणसं आपापसांत बोलताना, 'केस फारच मोठे झालेत, लहान करावे लागतील.' ( लांब / आखूड ऐवजी ) असा गैरपरिमाणी उपयोग सर्रास करतात. याचा अर्थ हाच की, काटेकोर, परिणामकारक भाषा वापरली जावी; परिणामकारक भाषेसाठी अलंकरणाची गरज नाही; तर जिवंतपणाची आहे. असा जिवंतपणा दैनंदिन अध्यापनात येणे अत्यंत गरजेचे आहे. हा जिवंतपणा आला तर विद्यार्थ्यांची विचार करण्याची कुवत वाढेल. त्याच्या अंगी भाषा लवचिकपणे वापरण्याचेही सामर्थ्य येईल. हीच तर आपली प्रधान उद्दिष्टे आहेत. पण चुकीच्या समजांमुळे व गैरमार्गी अध्यापनामुळे माध्यमिक शालांत परीक्षेतले काय किंवा विद्यापीठीय शिक्षण घेणारे विद्यार्थी काय पाच ओळीदेखील स्वतः आत्मविश्वासपूर्वक लिहू शकत नाहीत. याबाबतीत दुसरा एक गैरसमज म्हणजे, भाषा म्हणजे जी ग्रंथनिविष्ट असते तीच. मग ती कितीही ग्रांथिक असेना. साहित्याची भाषा निराळी त्यातही वेगवेगळ्या कालखंडातली निराळी व व्यावहारिक पायाशुद्ध मराठी निराळी हे लक्षात घेतले पाहिजे. हे लक्षात घेतले म्हणजे मराठी भाषा म्हणून ग्रांथिक भाषेवर शंभर टक्के विसंबून राहण्यापेक्षा व्यावहारिक मराठी ही प्रयत्नपूर्वक अभ्यासाने शिकावी लागते हे लक्षात येईल. व शालेय शिक्षणाच्या आरंभापासून ते अंतापर्यंत लवचिक भाषा वापराचे सामर्थ्य क्रमाने विकसित करण्याची गरज स्पष्ट होईल. समाजजीवनात सामूहिक अभिसरणाची माध्यमे ( mass media of communication ) म्हणून वर्तमानपत्रांनीही जबाबदारी स्वीकारली पाहिजे. तरच संज्ञापन होईल. नाही तर मग तीच वर्तमानपत्रे 'प्रवेश उपलब्ध' सारखे ढिसाळ शब्दप्रयोग वापरून जाहिराती, बातम्या छापत राहतील.

इथवर आपण मौखिक आकलन व अभिव्यक्ती ह्या दोन कौशल्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे विचार केला. आता वाचन व लेखन (म्हणजेच लेखी आकलन व अभिव्यक्ती) ह्यापुढील दोन कौशल्यांचाही विचार करू या. अर्थात या दोन्ही कौशल्यांचा सुटासुटा विचार करण्याची मला फारशी गरज वाटत नाही. म्हणून स्वतंत्र उल्लेख न करता त्यांचा एकत्रितच विचार करावयाचे ठरविले आहे.

लेखनाचा शुद्धाशुद्धतेशी फार संबंध जोडला जातो. तसा बोलण्याशीही जोडला जातोच. उलट शुद्ध कसे बोलावे व शुद्ध कसे लिहावे व त्याची चिकित्सा करणे यालाच दादोबा पांडुरंगांनी व्याकरण म्हटले आहे. पण हे पूर्णपणे खरे नाही. कारण व्यवहारात लोकांकडून बोलली जाणारी भाषा मग ती बोली एक असो अगर अनेक असोत त्या

अशुद्ध असण्याचे काहीच कारण नाही. उलट, लोकांच्या बोलण्याचा नीट अभ्यास करून भाषा कशी बोलली जाते, या विषयी जे नियम शोधून काढण्यात येतात त्यांनी होणारे मार्गदर्शन म्हणजेच व्याकरण. आणि ही बोली ज्या लेखनात वापरली जाते ते त्या काळचे साहित्य अशा रीतीने व्यवहारातली भाषा व्याकरणकर्त्यांना आणि साहित्यिकांना मार्गदर्शक ठरली पाहिजे तरच ते व्याकरण शुद्ध आणि ते साहित्य प्रभावी ठरेल [१] असा विचार केला तर शुद्धाशुद्धतेच्या अजब कल्पना पार बदलतील.

पण शालेय शिक्षणाच्या प्रारंभकाळात शुद्धलेखनाचे भूत मानगुटीवर बसते व विद्यार्थ्यांची दमछाक करते. विद्यार्थी आनंद व आत्मविश्वासाने लिहू लागला की लगेच त्याला अमुक अक्षर ऱ्हस्वाऐवजी दीर्घ असावे. हा 'श' असा 'ष' असावा असे सांगण्यात येते व तिथेच तो गोंधळून खिन्न होतो. व 'हे तर वरचं आहे, आपले ते काम नोहे' अशी समजूत करून मोकळा होतो. वाचतांनाही 'च' वर्गीय व्यंजनांचे उच्चार तालव्य निराळे व दंतमूलीय निराळे असे होतात. म्हणून बरेचदा अपेक्षित उच्चार होत नाही. त्याला थांबवून कानगी केली जाते. इथेही तो बिचकतो. याबाबतीत प्राथमिक स्तरावर ऱ्हस्वदीर्घ, दंतमूलीय-तालव्य उच्चारभेद ह्यांचा आग्रह न धरणेच इष्ट ठरेल. लिपीही अधिकाधिक लेखनसुलभ करावी. तसा प्रयत्न झालेला आहे. पण अजून संशोधनाची गरज आहेच. तसेच काही अडचणींच्या जागांना फाटा द्यावा. उदा. ञ, ङ ही अनुनासिके, ष हा घर्षक इ. काढून टाकावेत. तसेच ऋ, ॠ, ऌ ह्या वर्णांची गरज संपवून त्याऐवजी इतर वर्णांची मदत घ्यावी. उदा. कृष्ण : क्रुश्ण. ह्यामुळे लेखन सुलभ होईल. तसेच "स्वरांचे ऱ्हस्वदीर्घत्व हे स्थानपरत्वे होत असेल तर इ, उ यांची अडगळ का काढून टाकू नये ?"[२] अनुस्वारानुसारी लेखनातही विद्यार्थ्यांना बुचकळयात पाडण्याऐवजी साधेपणा आणावा. चूकबरोबरीचा निकष बाजूला ठेवावा. उदा० अंबादास—अम्बादास, संबंध—सम्बन्ध इ. अशा रीतीने प्राथमिक स्तरावर पहिली चारेक वर्षे तरी वरील बाबीचे नियम लवचीक करावेत. कुठल्याही प्रसंगी त्याला हे कठीण वाटू नये. सुरुवातीला लेखनाचे ज्ञान क्रमाक्रमाने करून द्यावे. आधी, स्वर नंतर स्वराधिष्ठित व्यंजनरूपे, व्यंजनयुग्मे इ. इथवर येईपर्यंत विद्यार्थ्याचा आत्मविश्वास वाढेल. त्याची भाषिक समज वाढलेली असेल. त्याला भाषा आपलीशी वाटायला लागली असेल. ह्या सर्व पूर्वतयारीचा फायदा घेऊन मग ऱ्हस्वदीर्घ भेद, श्र—स्र श—ष ह्या साम्याक्षरातील सूक्ष्म भेद, तालव्य-दंतमूलीय उच्चारभेद, इ, उ या स्वरांचे अंती दीर्घत्व व इतरत्र ऱ्हस्वत्व अशासारख्या नियमवजा सूचना टप्प्याटप्प्याने द्याव्यात. शालांत परीक्षेपर्यंत भाषिकदृष्ट्या सर्व पातळीवरच्या शुद्धतेची तयारी करून घेता येईल. अशी तयारी प्राथमिक व माध्यमिक स्तरांवर झाली की विद्यार्थी विद्यापीठीय स्तरावर चुका करणार नाहीत. हे प्राथमिक व माध्यमिक स्तरावर व्हावे. त्याला कारण ह्या स्तरांवरच वैयक्तिक सराव (Individual

drilling ) व सामूहिक सराव ( Chorus drilling ) करता येतो. आणि मुख्य म्हणजे विद्यापीठ पातळीवर ह्या किरकोळ स्वरूपाच्या गोष्टी राहूही नयेत. कारण इथे विद्यार्थ्याला ह्या सामग्रीवर स्वबळाने, स्वकल्पकतेने ज्ञानविश्व रुंदवावयाचे असते. पण दुर्दैवाने विद्यापीठीय स्तरापर्यंत हे प्रश्न टिकून आहेत. इतकेच नव्हे तर, विद्यापीठ पार केल्यावरही कायम राहतात.

## संदर्भ


१. अवतरण : अशोक रा. केळकर, **वैखरी**, मुंबई : मॅजेस्टिक, १९८३, पृ. ८० वरून.

२. रा. गो. सराफ, 'व्यावहारिक मराठीचा शालेय पाया : इयत्ता १ ते ७' **नवभारत**, ऑगस्ट–सप्टेंबर १९८१, पृ. १४९

३. ना. गो. कालेलकर, 'अध्यापन : भाषेचे आणि साहित्याचे', **नवभारत**, ऑगस्ट–सप्टेंबर १९८१, पृ. ११३.

४. कालेलकर १९८१, उपरिनिर्दिष्ट, पृ. ११३.

५. या ठिकाणी 'कोकणी' म्हणजे कोकणा ह्या आदिवासी जमातीची बोली.

६. केळकर १९८३, उपरिनिर्दिष्ट, पृ. ७५.

७. सराफ १९८१, उपरिनिर्दिष्ट, पृ. १५०.

८. ना. गो. कालेलकर, **भाषा आणि संस्कृती**, मुंबई : मौज १९६२, पृ. ४३

९. कालेलकर १९६२, उपरिनिर्दिष्ट, पृ. ५६

१०. कालेलकर १९६२, उपरिनिर्दिष्ट, पृ. ८०



**व्ही. पी. नाईक हायस्कूल, सटाणा ४२३३०१, जिल्हा नाशिक**


मानवी जीवनात सगळ्यात जास्त कीव करण्यासारखी गोष्ट म्हणजे एखादया मूर्खाला मूठभर फुले उधळताना पाहणे व त्यानेच पिंजून टाकलेल्या पाकळयांभोवती त्याचीच चालणारी बडबड ऐकणे होय.

**ई. एस्. डॅलस**

# शैक्षणिक संज्ञापनामधली एक कोंडी

नीळकंठ रथ

मराठी अर्थशास्त्र परिषदेसारख्या संस्थेची स्थापना ही एक आवश्यक आणि म्हणूनच स्वागतार्ह अशी घटना आहे. गेल्या दहापंधरा वर्षांत मोठ्या संख्येने आणि वाढत्या प्रमाणात विद्यार्थी पदवी आणि पदव्युत्तर वर्गातून अर्थशास्त्र आणि तत्सम इतर सामाजिक शास्त्रांचा अभ्यास मराठीतून करू लागले आहेत. अर्थातच, शिकण्या आणि शिकविण्यासाठी मोठ्या प्रमाणात मराठीतून अर्थशास्त्रीय वाङ्मय उपलब्ध होण्याची गरज आहे. याचबरोबर अर्थशास्त्राच्या शिक्षकांनी आणि अभ्यासकांनी वेळोवेळी एकत्र जमून अर्थशास्त्रीय प्रश्नांची चर्चाही निखळ मराठीतून करायला हवी. ही परिषद या दोन्हीही गोष्टी घडवून आणण्यात प्रयत्नशील आहे ही आनंदाची बाब आहे.

एकीकडे असा मराठी भाषेचा माध्यम म्हणून उच्च शिक्षणात वापर वाढत असतानाच दुसरीकडे घडून येत असलेल्या एका गोष्टीकडे मला लक्ष वेधायचे आहे. आवश्यक ते वाङ्मय इंग्रजीतून वाचण्याची आणि समजावून घेण्याची, विद्यार्थ्यांची आणि तरुण शिक्षकांचीही क्षमता दिवसेंदिवस कमी होत आहे. परिणाम असा झाला आहे की, उपलब्ध अशा प्रचंड अर्थशास्त्रीय वाङ्मयापर्यंत, केवळ ते इंग्रजीतून आहे म्हणून, हे विद्यार्थी पोचूही शकत नाहीत. ही मोठी चिंतेची बाब आहे. जरी यातून उपयुक्त वाङ्मय मराठीतून निर्माण होण्यास काहीसे प्रोत्साहन मिळाले तरी नजीकच्या भविष्यकाळात तरी निदान यातून उच्च अभ्यासासाठी पुरेसे वाङ्मय उपलब्ध होईल असे मला वाटत नाही. विशेषतः पदव्युत्तर पातळीवरील अभ्यासाची गरज यातून भागविली जाणे खचितच कठीण आहे. युरोपमधील अनेक राष्ट्रांतून तसेच जपानमध्ये त्यांच्या त्यांच्या भाषांमधून आपल्या मराठीपेक्षा किती तरी अधिक प्रमाणात अर्थशास्त्रीय वाङ्मय उपलब्ध आहे. तरीही ती राष्ट्रे इंग्रजीतील अर्थशास्त्रीय आणि इतर विषयांचे जे ज्ञान उदंड वाढत चालले आहे त्याचा लाभ घेण्यासाठी आपल्या विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषा शिकायला उद्युक्त करीत आहेत. आपल्या बाबतीतही ही गोष्ट अपरिहार्य अशीच आहे. आपल्या शाळा-कॉलेजातून माध्यम जरी मराठी (किंवा प्रादेशिक भाषा) हे असले तरी इंग्रजी हा एक सक्तीचा विषय म्हणून शिकवण्यामागे हीच भूमिका प्रामुख्याने आहे. इंग्रजी सुलभतेने बोलता किंवा लिहिता येणे यापेक्षाही इंग्रजीतील वाङ्मय सहजतेने वाचता येईल व समजावून घेता येईल

अशी तयारी विद्यार्थ्यांची होईल यावरच मुख्य भर दिला गेला पाहिजे. यामुळेच मला असे वाटते की इंग्रजीचे एक 'ग्रंथालयीन भाषा' म्हणून आपल्या विद्यापीठीय शिक्षणात असलेले स्थान नाकारून चालणार नाही. तसे करणे हे अंतिमतः उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात तरी धोक्याचे आहे.

तसे पाहिले तर इंग्रजी भाषेऐवजी शालेय शिक्षणाचे माध्यम म्हणून प्रादेशिक भाषेचा वापर जवळजवळ १९४० सालापासून व्हायला लागला. तेव्हापासून शाळेत इंग्रजी फक्त एक भाषाविषय म्हणून शिकविला जाऊ लागला. असे असूनसुद्धा माझ्यासारखे जे अनेक विद्यार्थी त्या काळी शाळांतून शिकले व पुढे महाविद्यालयात दाखल झाले, त्यांना इंग्रजी भाषेतून दिलेली व्याख्याने समजायला अगर इंग्रजीत लिहिलेली पुस्तके वाचायला मुळीच जड गेले नाही. सर्वसाधारण विद्यार्थी इंग्रजी भाषेत बऱ्यापैकी लिहीतही असे. काही वर्षांनंतर विद्यापीठीय परीक्षांच्या उत्तरपत्रिका प्रादेशिक भाषांतून लिहायला परवानगी दिली गेली आणि त्याच वेळी महाविद्यालयातून शिकण्यासाठी प्रादेशिक भाषेचा माध्यम म्हणून वापर होऊ लागला. परंतु माध्यमिक शाळेतील सहा वर्षांचे व उच्च.माध्यमिक पातळीवरचे आणि महाविद्यालयातले पाच वर्षांचे असे मिळून अकरा वर्षांचे इंग्रजी भाषेचे सक्तीचे शिक्षणही चालूच राहिले. पण इंग्रजी भाषेच्या ज्ञानाबद्दलची परिस्थिती आज फार वेगळी व चिंताजनक झाली आहे. पदवीधर आणि लायक विद्यार्थ्यांनासुद्धा एक लहानसा इंग्रजीतील परिच्छेद वाचायला पंधरा मिनिटे लागतात. शब्दकोश पाहून आणि तीनतीनदा वाचूनही त्या परिच्छेदाचा धड अर्थही समजायची मारामार. इंग्रजीचा अभ्यास अकरा वर्षे करूनही पदरी काहीच नाही असे म्हणण्याची पाळी येते.

विद्यार्थ्यांना इंग्रजी शिकण्यात स्वारस्य नाही म्हणून अशी परिस्थिती उद्‌भवते असे म्हणणे बरोबर नाही. या संदर्भात एम. ए. च्या वर्गात शिकणारा माझा एक विद्यार्थी विव्हल होऊन काय म्हणाला ते मी कधीच विसरणार नाही. तो म्हणाला, "सर, मी खेड्यातला मुलगा. शाळा संपवून जेव्हा तालुक्याच्या ठिकाणी कॉलेजमध्ये आलो तेव्हा ठरवून टाकलं की आता आपलं मराठी सुधारलं पाहिजे. त्यासाठी आम्ही चौघेजण मिळून आमच्या तुटपुंज्या पैशांतून 'सत्यकथे'ची वर्गणी चार वर्षं भरली. पण बघा सर, कॉलेजमधल्या कुणीही शिक्षकानं, 'पोरांनो, तुम्हाला इंग्रजीही वाचायला यायला पाहिजेच' असं चुकून तरी सांगितलं असतं तर ?" म्हणूनच मी म्हणतो विद्यार्थ्यांवर दोष ढकलून आपल्याला नामानिराळे होता येणार नाही. विद्यार्थ्यांना जेव्हा समजावून दिले जाईल की मराठी आणि इंग्रजी या दोन्हीही भाषांतले विषयाला अनुलक्षून लिहि-लेले वाङ्मय वाचले पाहिजे, समजावून घेतले पाहिजे, त्याशिवाय आपण पास होऊ शकणार नाही किंवा आपल्याला विषय नीट कळणार नाही तेव्हा अंधुकशी प्रेरणा असलेले विद्यार्थीसुद्धा इंग्रजी भाषा शिकण्याचा जरूर तो प्रयत्न करू लागतील.

परिस्थिती इतकी गंभीर आहे की सर्वसाधारण लोकांनाही असे वाटायला लागले आहे की, विद्यार्थ्यांना जर इंग्रजी नीट शिकायचे असेल तर शिशुवर्गापासूनच सर्व गोष्टी इंग्रजीतूनच शिकल्याशिवाय गत्यंतर नाही. इंग्रजी माध्यमाच्या शाळांची शहरांत, लहानमोठ्या गावांत आणि ग्रामीण भागातही पावसाळ्यात उगवणाऱ्या कुत्र्यांच्या छत्र्यांसारखी भरमसाट वाढ झाली आहे. २५–३० वर्षांपूर्वी शाळेतले माध्यम आता आहे तसेच होते आणि तरीही त्या वेळचे विद्यार्थी बऱ्यापैकी इंग्रजी लिहूबोलू शकत होते यावर सध्याची तरुण पिढी विश्वास ठेवायलाच तयार नाही. आज जर्मन आणि रशियन यांसारख्या परकीय भाषा केवळ दोन वर्षांच्या अर्धवेळ अभ्यासक्रमाद्वारे, विद्यार्थ्याला स्वतः वाचण्यापुरत्या शिकता येतात. यापुढे जाऊन भाषेची समज आणखी वाढण्यासाठी त्या त्या भाषांतले जास्तीत जास्त वाङ्मय योग्य पद्धतीने वाचणे हाच उपाय. इंग्रजीचे ११ वर्षे अध्ययन करून तिचा ग्रंथालयीन भाषा म्हणून उपयोग करण्याइतपत ती आपल्याला आत्मसात करता येईल हे आपण मानले पाहिजे.

या ठिकाणी आणखी एका गोष्टीचा उल्लेख मला करायचा आहे. मराठीतून प्रकाशित होणाऱ्या शास्त्रीय साहित्याचा दर्जा उत्तम असावा, निदान प्रसिद्ध होणारे वाङ्मय चुकीचे नसावे याबद्दल कुणाचे दुमत असेल असे वाटत नाही. इंग्रजीत प्रसिद्ध होणाऱ्या दर्जेदार अर्थशास्त्रीय साहित्यापासून आपले विद्यार्थी आणि अनेक तरुण शिक्षक देखील वंचित होत असल्याने अर्थशास्त्राच्या मराठीतील पुस्तकांमधून, त्यातही प्रामुख्याने क्रमिक पुस्तकातून, केले जाणारे अर्थशास्त्रीय विश्लेषण किमानपक्षी चुकीचे असणार नाही याची खबरदारी घेतलीच पाहिजे. याकरिताच मराठीतून प्रसिद्ध होणाऱ्या अर्थशास्त्रीय पुस्तकांचे नेटकेपणाने आणि निर्भीडपणाने केलेले टीकात्मक परीक्षण हे 'अर्थसंवाद'चे किंवा अशा वार्षिक अधिवेशनांचे एक महत्त्वाचे काम असायला हवे. आणि ते सातत्याने करत राहायला हवे. लेखकांनाही उपयुक्त ठरणारी अशीच ही बाब असून त्यांना त्यांच्या ग्रंथांच्या पुढील आवृत्त्या तरी यामुळे सुधारता येतील

अर्थशास्त्राचे अध्ययन आणि अध्यापन याबाबतचे प्रश्न अर्थातच केवळ माध्यमाच्या प्रश्नापुरते मर्यादित नाहीत. गेली अनेक वर्षे अर्थशास्त्र शिकविताना आपण त्याचे सरळसरळ दोन भाग केलेले आहेत. एक म्हणजे सैद्धांतिक अर्थशास्त्र आणि दुसरे म्हणजे भारतीय अर्थशास्त्र. विद्यार्थ्यांची ठाम समजूत अशी असते की यातील पहिला भाग हा निव्वळ विश्लेषणात्मक असा असून दुसरा केवळ वर्णनात्मक असा आहे. त्याच्या मनात तरी या दोन्हींचा मेळ कुठे घातला जातो असे दिसत नाही. वास्तविक आपल्या सगळ्यांनाच हे माहित आहे की अर्थशास्त्रात काय किंवा कोणत्याही सामाजिक शास्त्रात काय, प्रत्यक्ष समाजस्थितीचे स्पष्टीकरण करण्यासाठीच केवळ अमूर्त पातळीवर तर्कशुद्ध अशी सैद्धांतिक मांडणी केली जाते. त्यामुळे हे सिद्धांत कितपत सुसंगत आहेत

हे त्यांच्यामुळे प्रत्यक्ष अर्थव्यवस्थेचे कार्य किती नेमकेपणाने कळून येते यावरून ठरते. परंतु बहुधा आपल्या शिकण्याशिकविण्यातून या संबंधाचे प्रतिबिंब क्वचितच पडलेले दिसून येते. उदाहरणार्थ, आपण जेव्हा चलनविषयक सिद्धांत शिकवितो तेव्हा त्याचा भारतीय चलनव्यवस्थेशी असलेला संबंध क्वचितच जोडून दाखवतो. याउलट जेव्हा भारतीय अर्थशास्त्रात चलनव्यवस्था समजावून दिली जाते तेव्हा त्याचा सैद्धांतिक संदर्भ सांगितला जात नाही. आपण जेव्हा रोजगार किंवा उत्पन्न याबाबतची समष्टि-स्तरावरील प्रतिमाने शिकवितो तेव्हा त्यांचे भारतीय परिस्थितीशी असलेले नाते लक्षात आणून देत नाही. अशा परिस्थितीत आपल्या विद्यार्थ्यांना अर्थशास्त्रीय विश्लेषण ( ज्याला ते ' सिद्धांत ' असे म्हणतात ) आणि भारतीय अर्थशास्त्र या दोन गोष्टी अगदी भिन्न आहेत असे वाटले तर त्यात नवल काय ? '

मला या घटनेच्या हानिकारक परिणामांकडे आपले लक्ष वेधायचे आहे. विद्यार्थी सिद्धांत शिकतो ते परीक्षा पास होण्यासाठी किंवा स्वतः पुढे शिक्षक झाला तर इतर विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी. एरवी ते सिद्धांत तो तत्काळ विसरूनही जातो. ज्या मागची विश्लेषणाची चौकट गळून पडली आहे असा भारतीय अर्थव्यवस्थेचा नुसता वर्णनात्मक आढावा घेतला की, हाच विद्यार्थी पुढील आयुष्यात शिक्षक होऊन किंवा शासकीय अधिकारी अथवा लोकनेता बनून त्या आढाव्याची केवळ पोपटपंची करीत राहतो. काहीजण अधिक धिटाईने सैद्धांतिक अभ्यासाची केवळ ' पुस्तकी ज्ञान ' म्हणून संभावना करतात आणि त्यात, सध्याची अवस्था पाहता, अगदीच तथ्य नाही असे नाही. आणखी एक गोष्ट. सर्वसामान्य विद्यार्थ्यांना यामुळेच विषयात रसही निर्माण होत नाही. वर्गात शिकवले जाणारे सैद्धांतिक अर्थशास्त्र जर ज्या जगात विद्यार्थी वावरतात त्या जगातील घटनांशी संबंध जोडून शिकवले तर त्यांनाही आपण काही तरी खरोखरच उपयुक्त शिकत आहोत असे वाटेल. दुर्दैवाची गोष्ट अशी की, आपल्या आजूबाजूच्या आर्थिक प्रश्नांची तार्किक मीमांसा करता येणे हा जो अर्थशास्त्र शिकण्याचा मूलभूत हेतू आहे तोच मुळी या संपूर्ण प्रक्रियेत साध्य होत नाही.

विकसित देशांमधील काही क्रमिक पुस्तके या पद्धतीने लिहिलेली आढळतात. परंतु तीच पुस्तके इकडे पूर्णतः उपयोगी ठरत नाहीत कारण त्यांचे संदर्भ वेगळे असतात, ते भारतीय अर्थव्यवस्थेचे नसतात. मराठीतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना उपयोगी असे वाङ्मय निर्माण करीत असताना आपल्यापुढे असलेले हे एक आव्हान आहे, आपल्याला मिळालेली एक संधी आहे.

## इतिकथन

प्रस्तुत लेखकाने सातव्या मराठी अर्थशास्त्र परिषदेच्या उद्घाटन-प्रसंगी ( पुणे १९८३·१०·२८ ) केलेल्या मराठी भाषणातला काही प्रासंगिक भाग वगळून आणि

काही भर घालून हा लेख तयार केला आहे. मूळ इंग्रजी मसुद्याचा मराठी छायानुवाद प्रा. रमेश पानसे यांनी केला होता. भर घातलेल्या मजकुराचा अनुवाद व जुळणी श्रीमती विमला रथ यांनी केली आहे. डॉ. रथ यांचे विवेचन अर्थविज्ञान हा विषय समोर ठेवून केलेले असले तरी इतरही बऱ्याच विषयांच्या शिक्षणाला ते लागू पडेल या कल्पनेने अधिक व्यापक वाचकवर्गापुढे ते विवेचन आल्यास उपयोग व्हावा असे वाटते.

**संचालक, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे ४११००४**

# टेबल म्हणजे टेबल

## पीटर बिक्सेल

एका म्हाताऱ्या माणसाची गोष्ट मी तुम्हाला सांगणारेय. तो आता एक अक्षरही बोलत नाही. तो अगदी थकून गेलाय. इतका, की त्याला हसूसुद्धा येत नाही की राग येत नाही. एका छोट्याशा गावात तो राहतो. एका चौकापाशी, रस्त्याच्या पार टोकाला. त्याचं वर्णन करताच येणार नाही, म्हटलं तरी चालेल. कारण इतरांपेक्षा निराळं असं त्याच्यात काही नाहीच्चे. त्याची टोपी राखाडी रंगाची आहे. त्याचे कपडे राखाडी आहेत. थंडीत तो राखाडी रंगाचा लांब कोट घालतो. त्याची बारीक मान अगदी ओढलेली दिसते आणि त्याच्या शर्टाची पांढरी कॉलर जराशी मोठीच वाटते.

घराच्या सगळ्यात वरच्या मजल्यावर त्याची खोली आहे. कदाचित पूर्वी त्याचं लग्न झालेलं असेल, त्याला मुलंबाळं असतील, कदाचित पूर्वी तो दुसऱ्या गावी राहत असेल. कधीतरी एकदा तो नक्कीच लहान असणार. पण ते खूप वर्षांपूर्वी. म्हणजे छोट्या मुलांना सुद्धा मोठ्यांसारखेच कपडे करत त्या काळी. आजीजवळच्या फोटो-मधे नसतात का, तसले. त्यांच्या खोलीत दोन खुर्च्या आहेत. एक टेबल आहे, एक गालिचा आहे, एक पलंग आहे अन एक कपाट आहे. छोट्या टेबलावर एक घड्याळ आहे. तिथेच वर्तमानपत्रं अन् अल्बम असतात आणि भिंतीवर एक आरसा न् एक चित्र टांगलेलं आहे.

हा म्हातारा माणूस सकाळी एकदा फिरायला जायचा आणि संध्याकाळी एकदा शेजाऱ्यापाजाऱ्यांशी थोडंसं बोलायचा अन आल्यावर टेबलाशी बसून राहायचा.

यात कधीच बदल झाला नाही. अगदी रविवारीसुद्धा हे असंच चालायचं. अन तो जेव्हा टेबलाशी बसायचा तेव्हा त्याला घड्याळाची टिकटिक ऐकू यायची. नेहमी ऐकू यायची.

एकदा एक छान दिवस उगवला. सूर्याचा स्वच्छ उजेड पडला होता. खूप थंडीही नव्हती, खूप उकाडाही नव्हता. पक्षी किलबिलत होते. लोक आनंदात होते. मुलं खेळत होती. अन विशेष म्हणजे हे सगळं त्या म्हाताऱ्याला मुळी एकदम आवडलंच !

तो जरासा हसला.

‘ आता सगळं बदलेल ’ त्याला वाटलं. त्यानं टोपी हातात घेतली. पावलं भराभर

उचलली. मधेच चक्क एक गिरकी सुद्धा घेतली. तो रस्त्यावर आला. मुलांकडे बघून त्यानं खुशीत मान डोलावली आणि फिरून घरापाशी आला. जिना चढला, खिशातून किल्ली काढली आणि खोली उघडली.

पण खोलीत मात्र सगळं तसंच होतं ! एक टेबल, दोन खुर्च्या न् अंथरूण आणि टेबलाशी बसल्यावर पुन्हा आपली घड्याळाची टिकटिक. त्याच्या सगळ्या आनंदावर विरजण पडलं ! कारण काहीच बदललं नव्हतं.

मग तो खूप चिडला.

त्यानं आरशात पाहिलं तर त्याचा चेहरा लालीलाल झाला होता. त्याचे डोळे बारीक झाले अन् मुठी आवळल्या गेल्या. त्यानं मुठी टेबलावर आपटल्या. आधी एकदाच आपटल्या मग आणखी एकदा आपटल्या. मग आणखी एकदा. असे तो टेबल बडवत राहिला न् जोडीला ओरडला.

' हे सगळं बदललंच पाहिजे, बदललंच पाहिजे.'

मग त्याला घड्याळाची टिकटिक ऐकू येईनाशी झाली. शेवटी त्याचे हात दुखायला लागले, आवाज शिणला तेव्हा कुठे टिकटिक परत ऐकू यायला लागली. पण काहीच बदललं नव्हतं.

' सारखं आपलं तेच तेच टेबल ' तो म्हणाला, ' त्याच खुर्च्या, तोच पलंग, तेच चित्र. आणि टेबलाला म्हणायचं टेबल, चित्राला म्हणायचं चित्र, पलंगाला म्हणायचं पलंग आणि खुर्चीला म्हणायचं खुर्ची का म्हणून ? ' फ्रेंच लोक पलंगाला म्हणतात ' लि ', टेबलाला म्हणतात ' ताब्ल ', चित्राला म्हणतात ' ताब्लो ' अन खुर्चीला म्हणतात ' शेज् ' आणि तरी त्यांना सगळं समजतंच की नाही ? आणि चिनी लोकांना-सुद्धा एकमेकांचं बोलणं समजतं.

' अंथरुणाला चित्र का नाही म्हणायचं ? ' त्याच्या मनात आलं अन् तो हसला. मग तो इतका हसला, इतका हसला की शेजाऱ्यांनी येऊन शेवटी विचारलं, ' अहो, गप्प बसायला काय घ्याल ? '

' आता कसं बदललं ! ' तो म्हणाला आणि अंथरुणाला तो तेव्हापासून ' चित्र 'च म्हणायला लागला.

' मी खूप दमलोय. जरा चित्रावर आडवा होतो.... ' तो म्हणाला आणि सकाळी चित्रात पडून राहून त्यानं विचार केला, की खुर्चीला काय बरं म्हणावं ? मग खुर्चीला त्यानं घड्याळ म्हणायचं ठरवलं.

तो उठला, कपडे करून घड्याळावर बसला. त्यानं हात टेबलावर टेकले. पण टेबल काही आता टेबल नव्हतं. आता त्याचं नाव होतं गालिचा.

हं, तर सकाळी म्हातारा चित्रातून उठला, गालिच्यापाशी घड्याळावर बसला अन् कशाला काय म्हणायचं ते त्यानं ठरवून टाकलं :

अंथरुणाला म्हणायचं चित्र
टेबलाला म्हणायचं गालिचा
खुर्चीला म्हणायचं घड्याळ
वर्तमानपत्राला म्हणायचं गादी
आरशाला म्हणायचं खुर्ची
घड्याळाला म्हणायचं अल्बम
कपाटाला म्हणायचं वर्तमानपत्र
गालिच्याला म्हणायचं कपाट
फोटोला म्हणायचं टेबल
आणि अल्बमला म्हणायचं आरसा.
हं, तर मग !

सकाळच्या वेळी तो म्हातारा बराच वेळ चित्रात पडून राहिला. नऊ वाजता अल्बमचे टोले पडले, मग तो उठला आणि कपाटावर उभा राहिला. मग त्यानं वर्तमानपत्रातनं कपडे काढले, ते चढवले आणि भिंतीवरच्या खुर्चीत पाहिलं. तो गालिच्यापाशी घड्याळावर बसला आणि त्यानं आरशाची पानं उलटायला सुरुवात केली. शेवटी त्याला त्याच्या आईचं टेबल सापडलं.

त्याला या सगळ्याची खूप गंमत वाटली. त्यानं दिवसभर ते घोकलं आणि नवे शब्द पाठ करून टाकले. आता सगळंच नवं होतं. तो माणूस नव्हता, तर पाय होता. पायाची झाली होती सकाळ ! आणि सकाळीला म्हणायचं होतं माणूस.

आता काय, सगळी गोष्ट तुम्हीसुद्धा पुढे लिहू शकाल. बाकीचे शब्दसुद्धा तुम्ही बदलू शकाल.

'टोला देणे'च्या ऐवजी म्हणायचं 'ठेवणे'
'थंडी वाजणे'ला म्हणायचं 'पाहणे'
'पडून राहणे'ला म्हणायचं 'टोला देणे'
'उभं राहणे'ला म्हणायचं 'थंडी वाजणे'
आणि 'बसणे'ला म्हणायचं 'उलगडणे'.
मग गोष्ट अशी होईल :

माणसाच्या वेळी तो म्हातारा पाय बराच वेळ चित्रात टोले देत राहिला. नऊ वाजता अल्बमनं ठेवलं. पायाला थंडी वाजत होती. मग तो कपाटाशी उलगडला.

म्हाताऱ्या माणसानं शाळेतल्या मुलांसारखी एक निळी वही विकत आणली आणि वही भरून सगळे नवे शब्द लिहून काढले. त्याला कित्ती तरी काम करायचं होतं. तो



अनुक्रमणिका

लोकांना आताशा क्वचितच बाहेर पडलेला दिसे.

त्यानं सगळ्या वस्तूंची नवी नावं पक्की ध्यानात ठेवली. पण त्याचबरोबर तो जुनी खरी नावं विसरून गेला. त्याची आता एक नवीच भाषा तयार झाली होती. आणि ती त्याची एकट्याची होती.

अधूनमधून त्याला त्याच्या नव्या भाषेत स्वप्नं सुद्धा पडायला लागली. शाळेत शिकलेल्या गाण्याचं मग त्यानं आपल्या भाषेत रूपांतर केलं आणि तो ती गुणगुणत असायचा.

पण हळूहळू त्याला भाषांतरही जड जायला लागलं. कारण जुनी भाषा तो पार विसरून गेला होता. त्याला त्याच्या निळ्या वहीत मग शब्द शोधावे लागत. मग त्याला लोकांशी बोलायची भीती वाटायला लागली. लोकांशी बोलायचं म्हणजे त्याला बराच वेळ विचार करावा लागे.

त्याच्या चित्राला लोक म्हणायचे अंथरुण
त्याच्या गालिचाला म्हणायचे टेबल
त्याच्या घड्याळाला म्हणायचे खुर्ची
त्याच्या गादीला म्हणायचे वर्तमानपत्र
त्याच्या अल्बमला म्हणायचे घड्याळ
त्याच्या वर्तमानपत्राला म्हणायचे कपाट
त्याच्या कपाटाला म्हणायचे गालिचा
त्याच्या टेबलाला म्हणायचे फोटो
आणि आरशाला म्हणायचे अल्बम.

हे सगळं इतकं जास्त झालं, की लोक बोलायला लागल्यावर म्हाताऱ्याला हसूच आवरायच नाही !

'काय, उद्या फुटबॉल खेळायला येणार ?' किंवा 'दोन महिने पाऊस पडतोय हो !' किंवा 'अमेरिकेत माझे एक काका राहातात' असं कुणी बोललं की हा लागायचा हसायला !

त्याला हसायलाच यायचं कारण ते काय बोलतायत त्याला मुळी समजायचंच नाही.

पण ही काही विनोदी गोष्ट नाही.

तिची सुरुवात उदास आहे न् शेवटही उदासच आहे.

राखाडी कोटवाल्या त्या माणसाला लोक काय म्हणतायत हे समजायचं नाही हे काही तितकंसं वाईट नाही.

त्याहून वाईट होतं ते हे की लोकांना त्याचं काही समजायचं नाही.

आणि मग तो काही बोलेनासाच झाला.



अनुक्रमणिका

तो अगदी गप्प असायचा,
आपल्याशीच बोलायचा-—

नंतर कधी त्यानं कुणाला 'काय, कसं चाललंय?' एवढंसुद्धा विचारलं नाही.

[पीटर बिक्सेल (जन्म १९३५) ह्या स्विस लेखकाच्या **किंडर गेशिइटेन** (मुलांसाठीच्या गोष्टी) या पुस्तकामधल्या 'आइन टिश इस्ट आइन टिश' या गोष्टीवरून हा अनुवाद केला आहे.]

**मूळ जर्मनवरून अनुवाद : वर्षा क्षीरसागर, १२९४ शुक्रवार पेठ, पुणे ४११००२**

# उपरी भाषा आणि थलकरी भाषा

अशोक रा. केळकर

काही दशकांपूर्वी मराठी कविता आणि मराठी कथा-कादंबरी यांनी आपल्या चतुःसीमा ओलांडायचे ठरवले. ( अजूनही ही सीमा ओलांडण्याची क्रिया पुरी झालेली नाही ) या चतुःसीमा म्हणजे पांढरपेशा समाज, शहरी-निमशहरी परिसर, पुरुषकेंद्री मांडणी, आणि मराठीभाषी हिंदु बहुसंख्याक समाज. हे सीमोल्लंघन सुरुवातीला केवळ जीवनदर्शनाच्या पातळीवर होते. जोपर्यंत विषय सीमेपलीकडचा असला तरी लेखक वाचक सीमेच्या आतलाच होता तोपर्यंत हे अपरिहार्य होते. साक्षरताप्रसाराबरोबर मराठी वाङ्मयाच्या लेखकवर्गात आणि वाचकवर्गात बहुजन समाजातील लोकांचा किंवा ' गावाकडच्या ' लोकांचा किंवा स्त्रियांचा किंवा विविध प्रकारच्या अल्पसंख्याकांचा जसजसा भरणा होऊ लागला तसतसे हे सीमोल्लंघन जीवनदृष्टीच्या पातळीपर्यंत पोचू लागले. ते तसे पोचणे वाटते तितके सोपे नाही. सीमेबाहेरची व्यक्ती प्रथम वाचक आणि नंतर लेखक बनते तोपर्यंत पुष्कळदा मनाने चतुःसीमांच्या आत येऊन नवी जुनी झालेली असते.

मराठी साहित्याच्या इतिहासामधल्या या महत्त्वाच्या पण लांबलेल्या, गुंतागुंतीच्या घटनेचे स्वरूप समजावून घेताना साहित्याचे वाहन म्हणून जी मराठी भाषा वापरली जात आहे तिला न्याहाळणे उद्बोधक होणार आहे टिपकागदावर उमटलेल्या खुणां-मधून मूळ मजकूर ताडण्यासारखा हा प्रकार आहे. भाषेचा टिपकागद हा बराच चोख असतो. त्यामुळे लक्ष्मण माने यांच्या ' उपरा ' या कथन-कृतीला जो भाषिक अपघात होणार होता तो ज्या मंडळींच्यामुळे टळला ( अनिल अवचट ? ) त्यांचे आपण मराठी वाचकांनी आभार मानले पाहिजेत. ' उपरा 'चे हस्तलिखित छपाईला देण्याअगोदर त्याची भाषा ' साफसूक ' करून म्हणजे पूर्णपणे प्रमाणभूत मराठी करण्याचा एक सद्हेतुमूलक पण भाबडा बेत होता. तो सिद्धीस गेला असता तर ? पण जाऊ दे. टळलेल्या अपघाताचा पंचनामा कशाला ?

लक्ष्मण माने यांच्या पुढची भाषिक समस्या सोपी नव्हती. भाषिक पातळीवरच्या सीमोल्लंघनाच्या ज्या अगोदरपासून मळलेल्या वाटा होत्या त्या या केकाडी भाषी, भटक्या समाजातल्या, गावाकडल्या पण ' गावकरी ' नसलेल्या, निरक्षर कुटुंबातून शिक्षण घेऊन ' वर ' आलेल्या ( म्हणजे नेमके कुठे ? ), आणि लेखनापासून जरा दूरच असलेल्या कार्यकर्त्या तरुणाला उपयोगी पडण्याजोगत्या नव्हत्या. ( ' माझी

टिंगल करण्यासाठी जरी कुणी म्हणालं असतं की तू पुस्तक लिही तरी मीच त्याची टिंगल केली असती ' असे लेखक प्रास्ताविकात म्हणतो. )

माने यांना सापडलेल्या वाटेचा शोध घेण्यापूर्वी ज्या अगोदरपासून मळलेल्या वाटा म्हणून उल्लेखिल्या त्यांच्याकडे एक ओझरती नजर टाकायला पाहिजे. एक वाट म्हणजे प्रमाणभूत भाषेवरच भिस्त ठेवायची, विषय सीमेबाहेरचा असणे पुरेसे मानायचे. माटेमास्तरांनी उपेक्षितांच्या अंतरंगाचा धांडोळा घेतला तो ( उदाहरणार्थ ) या वाटेने. दुसरी वाट पहिलीच्या जराच पलीकडची आहे. ती म्हणजे चतुःसीमेच्या आतल्या भाषेचेच थोडे वेषांतर करायचे. ग. ल. ठोकळांच्या कविता ( आणि स्वतंत्र सामाजिक नाटकातला रामागडी आणि सरोजिनी बाबर यांचे गद्य ) हीच भाषा बोलतात. तिसरी वाट म्हणजे आतली भाषा आणि बाहेरची भाषा यांना आपापला हिस्सा उचलायला सांगायचे. व्यंकटेश माडगूळकरांचे कथन प्रमाणभूत मराठीत तर संवाद, स्वगते माणदेशी मराठीत असतात. चवथी वाट म्हणजे सीमेबाहेरच्या लेखकाने सरसकट आपल्या स्वतःच्या भाषेत रचना करायची. म्हणजे जी गोष्ट निरक्षर बहिणाबाई चौधरींनी किंवा निमसाक्षर लक्ष्मीबाई टिळकांनी आपसूक केली ती साक्षर माणसाने मुद्दाम करायची. आनंद यादव किंवा ना. धों. महानोर ही वाट चोखाळतात. ही वाट वाटते तेवढी सहज सोपी नाही. ( यादवांचीच झाडाबद्दलची ही दोन वाक्ये पहा, ' खळाळ ' संग्रहामधल्या ' धुणं ' या गोष्टीतली– ' झाडांच्या पोटात वारं घुसलं नि झाडं फुगार झाली ' आणि ' मनात असतील तेवढी हिरवी पानं उघडी करून त्येंच्या सावलीत थंड-पणानं बसलेली झाडं '; दुसरे वाक्य ' गोष्टी'तले न वाटता ' कथे ' मधले वाटते.) भाषेमधल्या चार वाटांची वहिवाट म्हणजे एका मर्यादित अर्थाने जुन्या संस्कृत प्राकृतच्या झगड्याचीच एक अर्वाचीन आवृत्ती आहे. ( ' संस्कृतवाणी देवे केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली ? ' असा एकनाथांचा रोकडा सवाल होता. )

तर काय सांगत होतो ? लक्ष्मण माने यांना या चारी वाटांपैकी कोणतीच वाट जशीच्या तशी उपयोगी पडण्यासारखी नव्हती. उपऱ्या माणसाने थलकऱ्यांची भाषा वापरायची, पण ती वापरायची मात्र उपरेपणाने नव्हे तर आपल्याला अभिप्रेत असलेल्या जीवनदर्शनाशी आणि जीवनदृष्टीशी आंगासरशी राहील अशा पद्धतीने मान्यांनी आपली नवीन वाट मुद्दाम शोधली नाही; त्यांना ती दया पवार, रावसाहेब कसबे, अनिल अवचट यांच्यासारख्यांशी स्वतःच्या जीवनाबद्दल ' गप्पा मारताना सहजपणे ' सापडली. ( ती गंजीफ्रॉक लेंग्यातली भाषा आहे, बुशशर्ट पँटमधली भाषा नाही. ) त्यांना वाट सापडली ती जरी सहजपणे सापडली असली तरी तिचे वर्णन मात्र मागच्या चार वाटांचे वर्णन जितक्या सहजपणे केले तितक्या सहजपणे करता येण्यासारखी स्थिती नाही. ते वर्णन करण्याअगोदर आपण ' उपरा 'च्या १६६ पानांतून काही नमुने घेऊ.

( १ ) गावंदरीला गाढवं सोडून इरड करत्या जितरावांच्या मागं मागं करीत वळत्या हानत आम्ही खेळत असायचो. गावंदरीतल्या खरकट्या दगडांची लगोरी नाहीतर गोट्या. अंगात शर्ट मागून आणलेला. ठिगळांचा अन् दुमडलेला. चड्डीचा पत्ताच नसायचा. सारं काम पायघोळ सदराच निभावून न्यायचा . . .

'रांडच्या, अजून झोपलायास ? आरं, दिस कुठं आला बघ !'. . . 'आजपासनं साळंत जायचं. हिथं हाय तवर. पाटी पेन्सल उंद्या आनुन दीन.' ( पृ. १ सुरुवात )

( २ ) मी म्हणत होतो.

"आळा मितनाद शाळा आनं मितनाद मिदा. नुसता खांचीरगा. राच्च आंट शाळा, नान इला हुगराव."

('मी शाळेत जाणार नाही. तिथं पोरं नुसती बसतात. आणि तो मास्तर काय बोलतोय, ते समजत पण नाही.') (पृ. ४, तुलनेसाठी माझ्या 'वैखरी' मधले पृ. ११८, २११ मधले विवेचन पहावे. )

( ३ ) दुसरा दिवस उजाडला. पुन्हा बा पहाटेच निघून गेला. आईनं चा केला. मला उठवलं. लहान पोरांना उठवलं. आई म्हणत होती.

'लक्षा, शाळंच्या वक्तापातुर तू गाढवं घिऊन जा. पोरं साळंला जायाला लागली की समीला गाढवाकडं घालवीन आन तू साळंत जा. साळंतनं पळून जावू नगं. नाहीतर बा जीव जास्तवर मारंल.' . . .

शाळेत नव्या जोमानं जायचं. आईला मार बसू द्यायचा नाही. नसंल करमत तरी बसायचं, असा बेत करीत केव्हा वेळ गेला, समजलंच नाही.

समी-माझी माझ्या पाठची बहीण– शेंबूड पुसत आली. म्हणाली,

"दादा निक्र आय बुटीरा ! निव हू. नान खेदया पाकाकी."

( दादा, आई बोलवतीया तुला. मी गाढवं सांभाळीन.) ( पृ. ६ )

( ४ ) देव घुमायला लागला. आन म्हणाला,

'आरं, तुझं डोळं झाकल्याती तुला आमी दिसंना ? . . हं–हं –' ( पृ. १६, देव मराठीत बोलतो असे दिसते.)

( ५ ) बानं चिलीम इजवली. राक झाडली. उठला.

. . . 'म्हाताऱ्या, तू माझ्यावरं चल. आरं, उगावतु त्यो चारा दिल्याबिगार मावळत न्हाय.' ( पृ. २३ )

( ६ ) जत्रा म्हणजी फिरस्त्यांसनी गाठी पडायच्या, बोलाचालायचा दिवस. मानसाचा काय न्योम, आज हाय, उंद्या न्हाय. ( पृ. २४ )

( ७ ) आज छबिना-पालखी निघनार होती भल्या सकाळी आईनं उठवलं. पळतच नदी गाठली. पानी तसं गारतोळ होतं. . . पाणी लई खडूळ झालं व्हतं. बायामानसं आंगुळा करीत होती. नदीपासनं दंडवत घालत व्हती. डपडं म्होरं वाजायचं. वल्या

आंगानं वाया दंडवत घेत होत्या. ( पृ. ३३ )

( ८ ) दुसरा कै म्हनत होता,

' जनता जनार्दन पाच पंच तुमी परमीसर हाय. तुमी न्याय कराल त्यो आमी मानून घिऊ. पुन्नाप्पा म्हणतुया, ते खरं हाय. ह्याला पैका पायजे हुता. ह्याने वाईल ठेवली. सनांग चांगलं हुतं. म्या ठिवून घेतलं. इस्त्यावर दूध ठेवल्यावर त्ये उतू जाईल का न्हाय ते सांगा ! . . . ' ( पृ ३५ )

( ९ ) पावसाळा सुरू झाला. कैकाड्यांची लग्नसराई सुरू होणार . . . बा पैसं जमा करायला लागला होता लग्नाचं काय ते शेवटचं सांग, म्हणून टुमणं लागलं होतं. मी वाला झोकांड्या देत होतो. ( पृ. ११३ )

(१०) लग्नाच्या आदल्या दिवशी पंचायत बसली. मी आरोपी होतो. . . .

पंचायत सुरू झाली. अर्थात सारं आमच्या भाषेतून. गावातली मंडळी जमली होती; परंतु त्यांना काहीच समजत नव्हतं. माझ्याशी मात्र बोलत होती. त्यांना काय चाललंय हे पाहिजे होतं. . . .

' लई चार बुकं शिक्लास म्हन आक्कल आली व्हय ? आमास्नी शिकवू नगं. सान्याचा इस्कूट हुईल. पंगतीला अन् मयतीला कुत्रा बसायचा न्हाय. ह्याचा इचार कर. चला रं, निघा.' ( पृ. १६३ )

(११) शाळेचा उंबरा न चढलेला माणूस कोर्टात वकिलानं आपल्या आशिलाची बाजू प्रभावीपणे मांडावी, तशी बाजू मांडत खंबीरपणे उतारे, उखाणे, म्हणींची पेरणी करीत, सारा अनुभव पणाला लावून लढला. ( पृ. १६४ )

(१२) शशीला सारंच नवीन होतं. पण एका जीवघेण्या दुखण्यातून पुन्हा उभं राहावं, तसा उभा राहाणार होतो. ( पृ. १६६, शेवट )

नमुने १ ते ८ सुरुवातीचे आणि त्यांचे संदर्भ स्पष्ट होतील इतपत जवळजवळचे घेतले आहेत. नमुना ९ दोनतृतीयांश पुस्तक उलटल्यावरचा आहे. नमुने ११, १२ पुस्तकाच्या शेवटाकडचे आहेत. पहिली गोष्ट लक्षात येते ती ही की ' उपरा'ची भाषा एकजिनसी नाही. पहिल्या दोन तृतीयांश भागात ती सतत वळणे घेत राहते. फार काय कैकाडी भाषेतल्या बोलण्याचे निवेदन सुद्धा एकसारख्या पद्धतीने केलेले नाही ( नमुने १, २, ३, ८, ९, १० यांची तुलना करावी ) शेवटच्या एक तृतीयांश भागातली भाषा तुलनेने एकजिनसी आहे, फक्त त्यातही काही भाषणे वेगळ्या बोलीतली आहेत. ( नमुने ९, १०, ११, १२ पहावे. )

हा एकजिनसीपणाचा अभाव खटकत नाही त्याअर्थी या विसंगतीच्या मागे काही सुसंगती दडली असली पाहिजे. ही सुसंगती म्हणजे त्या त्या ठिकाणची भाषा आणि त्या त्या ठिकाणचा संदर्भ यांच्यामधली सुसंगती आहे. त्या त्या ठिकाणचा संदर्भ दोन पातळीवरचा आहे– एक त्या ठिकाणी आपल्यासमोर उभ्या केलेल्या जीवनाच्या तुकड्याचा

संदर्भ आणि दुसरा निवेदक माने आणि अवधान देऊन ऐकणारा त्यांचा साक्षर मराठी श्रोता ( होय श्रोताच. वाचक नव्हे ). बापूंच्या निरक्षर लक्ष्माचा भाऊंच्या शिक्षित लक्ष्मण माने कसा झाला याचे कथन करताना भाषा अवस्थांतरे दाखवते. मुख्यतः सातारा भागातल्या देशावरच्या ग्रामीण भागातल्या बहुजनसमाजाची बोली ( बिऱ्हाड कोकणात जाते तेव्हाची तिथली बोलीही टिपली आहे, पृ. ४६–७ ) आणि प्रमाणभूत बोलीच्या जवळ जाणारी अनुप्रमाण बोली यांच्यात पृ. ११३ पर्यंत आंदोलन होत राहते; कैकाडी भाषणांचे मराठीकरण करतानाही हे आंदोलन दिसते. शाळेशी संबंध आला की भाषा अनुप्रमाण होते, लक्ष्मा शाळेपासून दूर असताना ती प्रमाणेतर राहते. त्याच्या मनाच्या ओढाताणीचे प्रतिबिंब भाषेच्या टिपकागदावर उमटते. पृ ११३ पासून तो नव्या जीवनात स्थिर होतो, भाषा झपाट्याने प्रमाणभूत बोलीपर्यंत पोचते. प्रमाणेतर बोली केवळ अवतरणांपुरती राहाते. मूळ कैकाडी क्वचितच आली आहे. ( पृ. १६४, १६५ वर कैकाडी जीवनाची काही खास वळणे दाखवण्यासाठी ती येते. ) हा झाला जीवनदर्शनाचा संदर्भ. दुसरा निवेदनाचा संदर्भ. जेव्हा 'तेव्हा'च्या जीवनावर 'आजच्या' लक्ष्मणचे भाष्य येते तेव्हाही भाषा थोडी वळण घेते. ( आन् बा हिरो झाला होता; पृ. ३, 'अन्यायाचा प्रश्नच कुणी काढला नाही.' हे पृ. ३६ वरचे पंचायतीने दिलेल्या निकालावरचे निवेदकाचे भाष्य, शिवाय नमुना ११ पहा. ) पण असली भाष्ये सहसा येत नाहीत. त्यांचा अभाव हे 'उपरा' च्या निवेदनाचे एक बळ आहे. एका बाबतीत 'उपरा'ची भाषा एकजिनसी आहे. वर्णन आणि कथन सुरुवातीपासून शेवटपर्यंत प्रमाणेतर बोलीशी सुसंगत अशा छोट्या छोट्या वाक्यांतून पुढे सरकते. ( नमुना ७ मधल्या शेवटच्या तीन वाक्यांत एक एक तपशील मागून आठवल्यावर भरत जाण्याची लकब पहावी. '.... आन् नदीपासनं वल्या अंगानं दंडवत घालत व्हत्या' असे एका दमात आणि मागच्या वाक्याला जोडून घेऊन वर्णन केलेले नाही. )

भटक्या जमातीच्या जीवनाचे दर्शन घडवताना भटक्या जमातीच्या (आणि परबापर्यंत त्यांच्या स्वतःच्या) जीवनदृष्टीचे सूचन करायला निवेदक विसरत नाही. क्वचित ही जीवनदृष्टी संवादात येऊन जाणाऱ्या सुभाषितवजा वाक्यांतून प्रकट होते. ( नमुने ५, ६, ८, १० पहावे. ) कधी उपमानांतून प्रकट होते. ('बाला करंट आला होता.' पृ. ३ 'आई पांढरी' पृ. १३, 'सनांग' नमुना ८, 'सारं कसं शांत...माणूस मरून पडलं तसं' पृ. ८) मुख्य म्हणजे प्रसंगातून प्रकट होते. ( लक्ष्माच्या आईने त्याला शाळेत घालण्याबद्दल नापसंती दाखवणे– 'तू लक्ष्माला मारून टाक' बापाने तिला मारणे– रात्री त्याने तिच्या जखमेला हळद लावून त्याचा मुद्दा तिला समजावून सांगणे, पृ. ५) आणि कधी भाषेच्या वळणातून, म्हणजे असे की प्रमाणेतर बोलीतही साहजिक, रोजची भाषासरणी आणि पंचायत, देवदेवस्की सारख्या प्रसंगीची प्रौढ भाषासरणी असा भेद दिसतो. ( नमुने

४, ८ पहा.) कामाचे बोलणे आणि रिकामपणच्या गप्पा (पृ. ९ पहा) असा भेदही दिसतो. भावना व्यक्त करताना ही बोली हळूवार प्रसंगी देखील जोरकस असते. ('तुझा हात हाय का दगड?'), तर रागाच्या प्रसंगी तिचे काय होईल हे समजण्यासारखे आहे ('लक्षाला... जाळून टाक, म्हंजी तुला बरं वाटंल' पृ. ५, 'हितं काय मुत पितुयास व्हय?... मडं उसकटलं त्याचं!' पृ. २) 'या मुक्कामावरून' लिहिलेल्या प्रास्ताविकातसुद्धा याची चुणूक दिसते ('गाढवाचं जिणं जगणाऱ्या मंडळींच्या वेदना').

अश्लील आणि अभद्र यांबद्दल नागर पांढरपेशा वाचकांचे कोड पुरवण्याचे दिवस आता गेले आहेत हे तर खरेच. पण दुसऱ्याही बाबतीत असे कोड पुरवण्यापासून मंडळी दूर चालली आहेत, ती बाब म्हणजे 'कठीण शब्दांचे अर्थ' टिपा देऊन किंवा अन्य प्रकारे देऊन. ('उपरा'च्या दुसऱ्या आवृत्तीत 'बिचाऱ्या' विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी तसे केल्याचे ऐकतो, पण ते काही बरे झाले नाही!) एक तर 'उपरा'ची प्रमाणेतर बोली देशावरचीच असल्यामुळे प्रमाणभूत बोली बोलणाऱ्यांना इतकी अपरिचित नाही. दुसरे म्हणजे ज्याची मायबोली प्रमाणभूत मराठी आहे अशा नागर पांढरपेशा श्रोत्याला जरा भाषिक गटांगळ्या खाऊ दे की! थोडे नाकातोंडात पाणी गेल्याखेरीज समाजाच्या या मोठ्या प्रवाहात त्याला पोहायला कसे येणार?

सुरुवातीला ज्या चार मळलेल्या वाटा सांगितल्या त्यापेक्षा ही पाचवी वाट कशी वेगळी आहे? ती संकरित आहे हे तर एव्हाना स्पष्ट झाले असेलच. खरे तर असे आहे की ती भाषा म्हणजे 'मागून आनलेला, ठिगळांचा', 'सारं काम.... निभावून' नेणारा 'पायघोळ' शर्टच आहे. या भाषेत 'चड्डीचा पत्ताच नाही.' या संकरितपणामुळेच ती बरेच काही निभावून नेते. कुटुंबात कैकाडी भाषा आणि बाहेर देशावरची प्रमाणेतर मराठी बोलणारा हा मुलगा नंतर प्रमाणभूत बोली बोलू लागतो. हे भाषिक स्थित्यंतर सामाजिक आणि सांस्कृतिक स्थित्यंतराचे प्रतिबिंब ठरते. (साधी गोष्ट— 'माझ्या बा'चे 'माझे भाऊ' होतात). 'शुद्ध' प्रमाणेतर बोली (वाट चवथी) आणि प्रमाणभूत– प्रमाणेतर बोलींची स्वच्छ वाटणी (वाट तिसरी) 'उपरा' साठी परवडली नसती. 'शुद्ध प्रमाणभूत बोली (वाट पहिली) आणि कृत्रिम 'प्रमाणेतर' बोली (वाट दुसरी) यांची तर गोष्टच राहू दे!

उपरी भाषा थलकरी होते ती अशी!

**इतिकथन :** श्री. प्रमोद मनोहर कोपर्डे, सातारा हे लक्ष्मण माने यांच्या **उपरा** बद्दलच्या लेखांचा संग्रह संपादीत आहेत. ग्रंथाली, मुंबई यांच्यातर्फे तो प्रकाशनाच्या मार्गावर आहे. या आगामी ग्रंथातून इथे अनुमतिपूर्वक पूर्वप्रकाशन होत आहे.



अनुक्रमणिका

# मराठी शिकताना : एका कन्नडिगाचे अनुभव

**विरूपाक्ष कुलकर्णी**

तसा मूळचा मी कन्नडभाषिक आहे. गत वीस वर्षं माझं वास्तव्य पुण्यात आहे. माझं जन्मगाव बेळगावच्या जवळचं हटंगडी. वडील कर्नाटक सरकारच्या नोकरीत असल्यामुळे माझं बालपण आणि शिक्षण कर्नाटकात आणि कन्नड भाषेत होणं साहजिकच होतं. पण बेळगाव ही महाराष्ट्र कर्नाटकाची सीमा असल्यामुळे लहान असल्यापासून मराठी समजत नाही असं मात्र झालं नाही. अर्थात बोलता मात्र येत नव्हतं.

लहानपणीची एक गोष्ट आठवते. एकदा माझ्या आईनं मला मराठी शेजारणीकडून सूप आणण्यास सांगितलं. कन्नड मध्ये सुपाला 'मर' म्हणतात. मी काकूंच्या दारात उभा राहिलो.

"काय रे ? काय पाहिजे ?"

"मर !" मी म्हटलं.

त्या हसत सुटल्या आणि म्हणाल्या, "का रे बाबा ! मला का 'मर' म्हणतोस ?"

मी गोंधळून धूम ठोकली ती थेट घरीच !

माध्यमिक शाळेत कन्नड आणि मराठी असे वेगवेगळे विभाग असल्यामुळे मराठीशी फारसा संबंध आला नाही. कॉलेजमध्ये मात्र मराठी मुलांशी ओळखी झाल्या आणि मराठी बोलण्याचा प्रसंग अधून मधून येऊ लागला.

नोकरीनिमित्त मुंबईला गेल्यावर माझ्या लक्षात एक गोष्ट आली. ती म्हणजे बेळगावमध्ये मला जी मराठी येत होती ती फारच अशुद्ध होती. माझ्या मराठीत असंख्य कन्नड शब्द आणि उच्चाराची पद्धतही कन्नड होती. (अर्थात आजही मी त्यातून संपूर्णपणे मुक्त आहे असं म्हणता यायचं नाही.)

एके दिवशी मी एका मराठी मित्राशी बोलताना दोन्ही भाषा चांगल्या जाणणारा एक मित्र तिथं आला आणि माझं मराठी ऐकून म्हणाला, "अरे, मला वाटलं होतं तुझं कन्नड मराठी–मिश्रित आहे. पण तुझी मराठी त्याहीपेक्षा बाईट आहे !"

त्यानंतर कितीतरी दिवस त्या मित्रासमोर तोंड उघडायलाही मला भीती वाटत असे.

त्या मित्रानं म्हटलं ते अगदी खरं होतं. बेळगावमध्ये दोन्ही भाषा व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आणि सरमिसळ झालेल्या स्वरूपात आहेत. तिथे मराठी कन्नडप्रमाणे हेल

काढून बोलण्याची पद्धत आहे. कन्नड भाषेत हे हेल येण्याचं एक कारण म्हणजे त्यातील चौदाखडी ( बाराखडी ऐवजी ) असावी असं मला वाटतं.

बेळगावच्या मराठीवरील दुसरा ' कन्नड ' प्रभाव म्हणजे इथला माणूस ' मी काम केलो ' असे म्हणतो. भूतकालात देखील कर्त्याप्रमाणे क्रियापदाला लिंग, वचन व विभक्ती प्रत्यय लावण्याची ही पद्धत कन्नड भाषेची आहे.

मराठी बोलताना पुण्याचा मराठी माणूस 'हो ? ' असं विचारतो तर बेळगावचा मराठी माणूस ' होऽऽय ? ' असा कन्नड हेल काढतो.

एकंदर बेळगावच्या लोकांना शुद्ध पुणेरी मराठी किंवा शुद्ध मैसूरी कन्नड शिकणं थोडं त्रासदायकच वाटतं.

सुशिक्षित कन्नड भाषिकांना संस्कृत किंवा हिंदी शिकताना देवनागरीचा परिचय होतो. माझ्या लहानपणी सातवीपासून संस्कृत आणि आठवीपासून हिंदी शिकवलं जात होतं. देवनागरी लिपी वाचता येऊ लागल्यानं मराठी वाचन सुकर होऊ लागलं. या काळात मराठी सिनेमा आपल्या ऊर्जितावस्थेत असल्यामुळे सर्वजण मराठी सिनेमाच पाहात. कन्नड सिनेमाचा वाईट काळ होता तो.

एकदा एका हॉटेलच्या बाहेरील फलकावर देवनागरी लिपीत लिहिलेली एक जाहिरात वाचली. मी उड्या मारत मित्रांकडे धावलो आणि म्हणालो, " एक संस्कृत सिनेमा आलाय. आपण पाहूया. " सगळ्या मित्रांनी माझी अशी टर उडवली की काही विचारू नका. कारण तो सिनेमा होता " दिसतं तसं नसतं. " मी माझं संस्कृतचं बेताचं ज्ञान वापरून ते " दिसतम् तसम् नसतम् " असं वाचलं होतं. आजही मराठीतील अनुस्वार मला अतिशय छळतात. त्यामुळे काही अनुस्वारांचे मराठी भाषेतील उच्चाटन निदान मला तरी सुखावह वाटतं !

मी काही शिस्तबद्ध शिक्षणक्रम घेऊन मराठीचा अभ्यास केला नाही. केवळ संभाषण आणि वाचन या गोष्टींवरच अवलंबून राहिलो. त्यामुळे मराठी भाषा येण्यास बरेच कष्ट आणि वेळ लागला.

मुंबईतील माझ्या दीड वर्षांच्या वास्तव्यानंतर नव्या नोकरीसाठी मी पुण्यास आलो. पुण्यात येताच मराठी भाषेचा नवा आविष्कार पाहिला आणि अनुभवला. इथल्या मराठीत बेळगावसारखा हेल काढण्याची पद्धत नाही की हिंदी–गुजरातीने मुंबईसारखे मिश्रण नाही. इथली भाषा कशी सिनेमा–नाटकातल्यासारखी नीट नेटकी !

एकदा माझ्या पत्नीची आतेबहीण बेळगावकडून आली. आमचं घर शोधत शोधत ती घरी येऊन पोहोचली. आणि तिनं माझ्या पत्नीला विचारलं, " काय ग, तुमच्या माडीवर नाटकाची प्रॅक्टिस चाललेय काय ?"

" नाही ! का बरं ? "

" काय की बाई ! तिथं पत्ता विचारत गेले होते. दरवाजा बंद होता आणि आतून

बोलण्याचा आवाज येत होता. अगदी नाटकातल्यासारखा ! ”

एकंदर काय तर पुण्यात आल्यापासून मलाही माझ्या मराठी भाषेवर विचार करण्याची वेळ आली. कुठल्याही द्रविड भाषेइतकीच कठोर व्यंजने असलेली मराठी भाषा पुण्यातील लोकांच्या तोंडी उच्चारांच्या ऱ्हस्वतेमुळे आपली कठोरता टाकून मधुर बनली की काय असं मला वाटतं.

त्या मानानं हिंदी भाषेचं शिक्षण शाळेत झाल्यामुळे तिला मराठीपेक्षा शास्त्रशुद्ध पाया मिळाला. पण त्याचा मराठी शिकताना तोटाही झाला. ‘ ज ’ आणि ‘ च ’ यांचा कन्नड आणि हिंदीतील उच्चार ‘ जहागीर ’ किंवा ‘ चेतक ’ मधल्या ‘ ज ’ आणि ‘ च ’ प्रमाणे असतात. मराठीत मात्र तोच उच्चार बऱ्याच वेळा ‘ जर ’ किंवा ‘ चमचा ’ मधल्या ‘ ज ’ आणि ‘ च ’ प्रमाणे असतो.

संस्कृतबरोबरच मराठी किंवा हिंदी शिकताना आम्हाला येणारी मुख्य अडचण म्हणजे त्या भाषेतील लिंग भेद. इंग्लिशप्रमाणे कन्नड भाषेत फक्त स्त्री आणि पुरुषांना स्त्रीलिंगी किंवा पुल्लिंगी मानले जाते आणि इतर सर्व काही नपुसकलिंगी. सूर्य-चंद्रादी काही शब्द त्यातील काव्यात्मकतेमुळे पुल्लिंगी ठरवले गेले आहेत. मराठी भाषा शिकताना प्रत्येक शब्दाचं लिंग लक्षात ठेवणं मोठंच जिकिरीचं काम वाटतं ! बरं, यासंबंधी काही नियम तरी असावेत ? तेही नाही. मला तर प्रश्न पडायचा, की कन्नड बोलताना शब्दांविषयी आपल्याला काही भावना वाटत नाहीत, मग या मराठी लोकांना एखादा शब्द स्त्रीलिंगी आणि एखादा पुल्लिंगी का वाटतो ! झाडाचं खोड उभं वापरलं तर ‘ तो ’ खांब होतो आणि छतासाठी आडवं वापरल्याकर त्याची ‘ ती ’ तुळई का होते हे अजूनही मला तरी न सुटलेलं कोडं आहे. अशी लिंगभेदाच्या बाबतीत जरी माझ्याकडून चूक घडली तरी नेमकं कुठं चुकलं हे मला कळत नाही. सगळे हसले त्याअर्थी आपलं चुकलं असेल एवढंच जाणवतं. याबाबतीत आमच्या मनात एक प्रकारचा भावनिक blankness असतो. म्हणूनच कन्नड माणसं मराठी बोलताना जास्तीत जास्त नपुंसकलिंगी शब्दांचा वापर करतात.

इतक्या प्रयासानं मराठी बोलत असताना एकदा मी माझ्या एका मराठी मित्राला म्हटलं, “ थोडी पेन दे रे ! ”

“ आमच्या मराठीत पेन स्त्रीलिंगी नसतं ! ” तो उत्तरला.

“ नसेल, पण नाहीतरी तुमच्या मराठीत प्रत्येकाला उगाचच स्त्रीलिंगी किंवा पुल्लिंगी ठरवण्याची पद्धतच आहे. ” मी वैतागानं म्हणालो.

बिचारा गप्प बसला. त्याच्या ठिकाणी एखादा भाषाशास्त्रज्ञ असता तर त्यानं माझं तोंड सहज बंद केलं असतं म्हणा ! तो गप्प बसलेला पाहून मला आणखी चेव आला.

“ अरे, फक्त मराठी शब्द पुरेसे झाले नाहीत म्हणून इंग्लिश शब्दातही तुम्ही

लिंगभेद पाळता !"

हिंदीचं थोडंसं ज्ञान असलेल्या माझ्यासारख्याचा आणखी गोंधळ होतो. 'हिंदी की आवाज' मराठीत 'हिंदीचा आवाज' होतो आणि उच्चारात फरक होतो तो वेगळाच.

बोली भाषेत आणि लेखीभाषेत सर्वच ठिकाणी फरक आढळतो. यावरून एक घडलेली घटना मला आठवते.

पुण्यात आल्या आल्या दैनिकातले अग्रलेख वाचून मी माझी मराठी सुधारण्याचा प्रयत्न करत होतो तेव्हाची गोष्ट. माझ्या एका अधिकाऱ्यानं कामाच्या संदर्भात मला एक प्रश्न विचारला.

मी उत्तर दिलं, "अजून कांही माणसें यावयाची आहेत. त्यांना लगेच काम करावयास पाठवतो."

ते अधिकारी गालातल्या गालात हसत म्हणाले, "तुम्ही कानडीअप्पा दिसता ! कुठल्या गावचे ?"

माझा मराठी येत असल्याचा अभिमान गळून पडला. मी विचारलं, "पण तुम्हाला कसे कळाले मी कन्नड आहे ते ?"

"तुमच्या अतिशुद्ध मराठी बोलण्याच्या धडपडीवरून !" ते शांतपणे उत्तरले.

मध्ये काही कामानिमित्त मी नागपूरला गेलो होतो. तिथल्या मित्राशी गप्पा मारताना माझं बोलणं मध्येच तोडून तो म्हणाला, "असा का पुण्यातल्या लोकांसारखा मध्ये मध्ये 'मला वाटलं की'– वगैरे बायकी बोलतोस ? पुरुषासारखा पुरुष असून मिळमिळीत का बोलतोस ?"

म्हणजे पुण्याच्या मराठीलाही नावं ठेवतातच की ?

मी त्याला म्हटलं, "बाबारे, मला दोष देऊ नकोस तू ! माझं काय ? मी नागपूरला रहायला आलो की तुझ्यासारखा बोलेन !"

ह्या सगळ्या झाल्या कन्नड माणसाला मराठी बोलताना येणाऱ्या अडचणी ! जेव्हा मराठी माणूस कन्नड शिकतो तेव्हाही तो अशाच मजेदार चुका करतो.

बेळगावला शेजारच्या घरी एक मराठी मुलगी नुकतीच सून म्हणून आली होती, आपल्या परीनं ती कन्नड शिकायचा प्रयत्न करत होती. एकदा विहिरीचं पाणी शेंदताना तिच्या हातून घागर विहिरीत पडली आणि बुडाली.

ती घाबऱ्या घाबऱ्या आमच्या घरी आली आणि कन्नडमध्ये म्हणाली, "बिंदगि मुणगिदळु !"

आणि आमच्या घरातले सगळेजण जोरात हसले. कारण तिनं 'घागर बुडाली' या मराठी वाक्याचा कन्नड अनुवाद केला होता. वास्तविक तिनं म्हणायला हवं होतं. "बिंदगी मुणगतु" (म्हणजेच "घागर बुडालं !").

पुण्याची मराठी शिकण्याच्या या व्यापापेक्षा आमची मैसूरची कन्नड भाषा सोपी बरं ! अधून मधून एखादा कन्नड शब्द पेरायचा आणि इंग्लिश बोलायचं की झालं !

**शशिप्रभा, मॉडेल कॉलनी, पुणे ४११०१६**

[ श्री. कुलकर्णी हे पेशाने एंजिनियर. विरूपाक्ष आणि उमा कुलकर्णी ही पतिपत्नी पुण्याच्या **तरुण भारत** च्या रविवार पुरवणीत कन्नड साहित्यिकांचा परिचय अधून-मधून देत असतात. श्री. कुलकर्णी यांनी वि. दा. सावरकर यांच्या **माझी जन्मठेप** चे कन्नड भाषांतर करून ठेवले आहे. श्रीमती कुलकर्णी यांनी शिवराम कारंत यांच्या कादंबऱ्यांची मराठी भाषांतरे केली आहेत. त्यापैकी **तनमनाच्या भोवऱ्यात** ही प्रकाशित झाली आहे. ]

## कानी पडलेला संवाद

काय ग, कुठल्या कॉलेजात मिळाली तुला ॲडमिशन ?

( पुण्यातल्या एका नामवंत महाविद्यालयाचे नाव घेऊन ) तिथे मिळाली आणि होस्टेलमध्ये पण मिळाली.

छान, रूम पार्टनर कोण मिळाली आहे ? चांगली आहे ना ?

आहे बाई कुणीतरी मराठी मीडियमची, नाव पण अजून विचारलं नाही.

म्हणजे ?

अग, होस्टेल प्रवेश मिळालेल्या मुलींमध्ये तीन मुली सोडून सगळ्या माझ्यासारख्या इंग्लिश मीडियमच्याच आहेत. त्यांना कुणी पार्टनर म्हणून घेईना. मग रेक्टरनी त्यातल्या दोघींना एका खोलीत टाकलं. तिसरीचं काय करायचं ? मला दया आली आणि मी तिला रूमपार्टनर म्हणून घ्यायला कबूल झाले झालं !

## विशेषणे आणि पुरुष

क्रियापदे व्याकरणातल्या प्रथम, द्वितीय, तृतीय पुरुषांच्या अनुसार बदलतात. बर्ट्रंड रसेल यांच्या मार्मिक विनोदबुद्धीला विशेषणेदेखील पुरुषानुसार फिरतात असा शोध लागला ( बी. बी. सी. वरच्या 'ब्रेन्ज ट्रस्ट' या कार्यक्रमात १९३० च्या सुमारास ). त्यांनी दिलेले उदाहरण पाहिल्यावर ते मराठीलाही लागू पडते असे लक्षात यावे.

I'm firm. ( मी खंबीर आहे )

You are obstinate. (तू हट्टी आहेस )

He is pigheaded ( तो हेकट, आडमुठा आहे. )

मराठीत नामांच्या बाबतीतही हा प्रकार होतो असे काहींचे म्हणणे आहे.

मी क्लार्क आहे.

तू कारकून आहेस.

तो कारकुंडा आहे.

फार्सीमध्ये 'कारकुन' म्हणजे काम करणारा. त्यावरून आठवण झाली.

मी कर्मचारी आहे.

तू कामगार आहेस.

तो कामकरी आहे.

असो. **भाषा आणि जीवन** च्या वाचकांना आणखी अशी विशेषणांची, नामांची कदाचित क्रियापदांचीही (पाणी प्राशन करणे; पिणे; ढोसणे) मजेदार त्रिके आढळली, तर ती अवश्य संपादकांकडे पाठवावी.

## नाटकाची भाषा नाटकी नको

नाटकाची भाषा कानात शिरली की मनात जिरली पाहिजे.

**गोविंद बल्लाळ देवल**

## प्रास्ताविक

मराठी आपली आहे हे तर खरेच. पण तिला जपण्याचा एक उत्तम मार्ग म्हणजे आपले मराठी कसे आहे याबद्दल जागरूक राहणे. विचारशक्तीचे देणे किंवा साहित्य-कलेचे देणे ही काही पूर्णतः आपल्या हातची गोष्ट नाही. पण भाषा टापटिपीने, समोरच्या श्रोत्याला किंवा समोर नसलेल्या वाचकाला सुखावह होईल अशी वापरणे ही तर आपल्या हातची गोष्ट आहे. या नवीन सदरासाठी टिपणे, उदाहरणे, सूचना, कात्रणे संपादकांकडे अवश्य पाठवावीत.

मात्र भाषेमधल्या शंकास्थळांबद्दल निर्णायक फतवे काढणे हे या सदराचे उद्दिष्ट नाही हे भान ठेवावे. ग्राह्य काय, क्षम्य काय, त्याज्य काय याबद्दल संपूर्ण एकवाक्यता मिळणे जिवंत भाषेच्या बाबतीत अशक्य दिसते सर्वच शंकास्थळे असली, कशातच एकवाक्यता नसली तर भाषेचा व्यवहार चालणे कठीण. उलटपक्षी प्रत्येक शंकास्थळा-विषयी एकवाक्यता झाली, म्हणजे शंकास्थळे उरलीच नाहीत तर भाषा वाहती राहणार नाही. (आपल्याला प्रमाणभूत मराठी भाषेची संस्कृत भाषा थोडीच बनवायची आहे ?)

## उच्चारविवेक

शब्दाच्या शेवटी अ, इ, उ हे स्वर आले तर त्यांचा उच्चार लांबतो, मग त्यांचे लेखन काही का असेना.

**अबब, इकडं; पाणी, आणि; गुरू, गुरु**

हे स्वर शब्दाच्या शेवटी न येता केवळ शेवटच्या अवयवात आले तरी उच्चार लांबवण्याचीच प्रवृत्ती आहे.

**मन, मण; तीन, हिंत; जून, गुण**

या ठिकाणी शेवटचा लिखित अकार उच्चारात नसल्यामुळे आधीचा स्वर हा शब्दात येणारा शेवटचा स्वर ठरतो. उदाहरणार्थ ‘शिथिल’ या शब्दाचे शि. थिल असे दोनच अवयव पडतात.

इथपर्यंत आपण स्वाभाविक प्रवृत्तीचा निर्देश केला. ज्याची मराठी स्वभाषा आहे त्याला तिच्याबद्दल मुद्दाम विवेक करायचे कारण दिसत नाही. पण...

असे काही संस्कृतमधून घेतलेले शब्द दिसतात की ज्यांच्या शेवटी आलेला लिखित अकार उच्चारायचा की नाही याबद्दल संभ्रम दिसतो.

धन याचा उच्चार मन, मण प्रमाणे ध लांबवून करायचा का दोन्ही स्वर ऱ्हस्व उच्चारून?

स्मित याचा उच्चार फीत सारखा करायचा का दोन्ही स्वर ऱ्हस्व उच्चारून?

सुत याचा उच्चार सूत सारखा करायचा का दोन्ही स्वर ऱ्हस्व उच्चारून?

इतर काही उदाहरणे : अचल, अखिल, विस्मित, शिव, बुध, गुज, यांच्या उलट सधन, कूळ, चकित सारख्या शब्दात हा संभ्रम दिसत नाही; शेवटचा लिखित अकार उच्चारात येत नाही आणि आधीचा स्वर लांबवला जातो.

धन, स्मित, सुत, अचल सारख्या वाङ्मयीन किंवा पारिभाषिक भाषासरणीतल्या शब्दांच्या बाबतीत दुसरा उच्चार ( शेवटचे दोन्ही स्वर ऱ्हस्व उच्चारून केलेला ) हा ग्राह्य दिसतो, पहिला उच्चार केवळ क्षम्य दिसतो दुसरा उच्चार कधी कधी जोडशब्दांतही कायम राहिलेला दिसतो : हितगुज, गुणदोष, मनमोहक.

कविता म्हणणे, औपचारिक निवेदन करणे यासारख्या उद्योगात क्षम्य उच्चार टाळून ग्राह्यच उच्चार करणे उचित दिसते.

## लिपिविवेक

हस्तलिखित, टंकलिखित, किंवा छापील मजकूर वाचताना र व्यंजनाला सरसकट ऱ्हस्व उकारच लावण्याची प्रवृत्ती बळावत असल्याचे जाणवते. रुसू आणि सुरू या दोन्ही शब्दांत एकच रु काढतात.

या निष्काळजीपणाला आळा बसावा यासाठी रु आणि रू लिहिण्याची पद्धत रूढ केली तर? बाराखडी शिकताना त्रास देणारा हा एकुलता अपवाद ठेवण्यात काही फायदा दिसत नाही; तोटा मात्र आहे. (जुन्या छापील पुस्तकात इतरही काही व्यंजनांना ऱ्हस्व उकार खाली न जोडता पुढे जोडलेला दिसतो. आज तो वापरातून गेलेला दिसतोच की!)

## मांडणीविवेक

लेखन, टंकन, मुद्रण करताना पुष्कळदा पृष्ठांक देण्याची वेळ येते. तो पानाच्या शिरोभागी मध्यावर, शिरोभागी कोपऱ्यात, तळाशी मध्यावर, तळाशी कोपऱ्यात यांपैकी कुठेही घालतात. अर्थात् एका प्रसंगी एकच पद्धत वापरतात! याला एक अपवाद दिसतो की लेख, प्रकरण इत्यादी यांची सुरुवात नवीन पानावर होते तेव्हा पृष्ठांक शिरोभागी सहसा देत नाहीत; तो अजिबात गाळतात किंवा तळाशी घालतात. या अपवादाला दोन कारणे दिसतात : नवीन सुरुवात असेल तेथे जादा कोरी जागा,

आडवी रेघ इत्यादी शोभादायक प्रकार करतात. त्यात पृष्ठांकाने विक्षेप येईल; त्याच प्रमाणे प्रकरणाचा क्रमांक आणि पृष्ठांक शेजारी शेजारी नको वाटतात.

तेव्हा पृष्ठांक पानाच्या तळाशी बरा. तो मध्यावर न ठेवता डावीकडच्या पानाच्या डाव्या कोपऱ्यात आणि उजवीकडच्या पानाच्या उजव्या कोपऱ्यात ठेवलेला बरा. या मांडणीमुळे पाने झरझर उलटून हवे ते पान शोधायला अधिक सोपे जाते. (पुस्तकाचे, प्रकरणाचे, नियतकालिकाचे धावते नाव पृष्ठांकाबरोबर देतात तेही पानाच्या तळाशीच घ्यावे. पृष्ठांक काय किंवा हे 'रनिंग टायटल' काय — ही काही मजकुरात समाविष्ट नसतात.)

आपल्याकडे काही टंकलेखक एक विचित्र प्रकार करतात. पानाच्या शिरोभागी त्या पानाचा पृष्ठांक ( उदाहरणार्थ ९ ) आणि तळाशी पुढच्या पानाचा पृष्ठांक ( या ठिकाणी १० ) असे दोन्ही देतात. टंकित मजकूर मोठ्याने वाचून दाखवायची वेळ आली तर पान उलटताना वाचनात विक्षेप यायला नको म्हणून नंतरच्या पानावरचे दोन तीन शब्द शिवाय आदल्या पानाच्या तळाशी उजव्या कोपऱ्यात टंकित करण्याची पद्धत आहे ती योग्यच आहे. पण तसे पुढच्या पानावरचे सुरुवातीचे शब्द देण्याऐवजी पुढच्या पानाच्या शिरोभागी असलेला पृष्ठांक आदल्या पानावर देणे म्हणजे एका सुयोग्य संकेताचे अयोग्य रीतीने केलेले आणि वाचकाला निष्कारण बुचकळ्यात टाकणारे पालन आहे! टंकलेखक आणि टंकलेखनशिक्षक यांनी ही पुढच्या पानाचा पृष्ठांक टाकण्याची चुकीची पद्धत बंद करावी हे बरे.

## शब्दरूपविवेक

भाषक म्हणजे भाषण करणारा, बोलणारा. भाषिक म्हणजे भाषेसंबंधी. उदाहरणार्थ

मराठीभाषक जनता, भाषिक जाणीव
भाषक ऐवजी भाषी वापरता येईल —
मराठी भाषकांना; मराठी भाषींना
पण भाषक ऐवजी भाषिक नको —
मराठी भाषिकांना; परभाषिकांना

योग्य नाही; परभाषा भाषकांना, मराठी भाषकांना योग्य होईल.

हिंदीमध्ये मराठीभाषाभाषी म्हणतात ते योग्य आहे पण बोजड आहे; भाषा हे पद अध्याहृत ठेवायला हरकत नसावी.

## अर्थविवेक

गंभीर शब्दाचा वापर आपण चुकीच्या अर्थाने करतो अशी एक जोरदार तक्रार

मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांनी नोंदवलेली आहे. (**रविवार सकाळ**, पुणे, १९८३.१०.०९ विनोदी जातीचे संमेलन ' पृ. ५) ती त्यांच्याच शब्दात ऐकण्यासारखी आहे. ,राजाध्यक्ष म्हणतात–

" विनोदी हा काही स्वतंत्र, स्वयंसिद्ध वाङ्मयप्रकार नाही ती एक वृत्ती आहे, ज्याच्यापाशी ती नाही त्याने कितीही खटाटोप केला तरी ती लाभणे कठीण. असले खटाटोपी विनोदी लेखन नको तेवढे आपण पाहतोच. ज्याच्यापाशी ती आहे त्याचे वैस लेखन त्याने उजळते. मग तो वाङ्मयप्रकार कोणताही असो. अगदी शोकात्मिकेसारखा घनगंभीर प्रकारही. किंबहुना आपल्या साहित्यात ' गंभीर ' या शब्दाबद्दलच अति-गंभीर आणि काहीशा प्राथमिक कल्पना जारी आहेत. तत्त्वांची, विचारांची चिकित्सा आणि विवरण करणारे लेखन ' गंभीर ' हे ठीकच आहे. पण त्या चिकित्सा-विवरणाचा दर्जा ध्यानात न घेता केवळ त्याला हात घातला आहे म्हणून एखाद्या लेखनाला व त्या लेखकाला आपण ' गंभीर ' म्हणून टाकतो ! वाचवत नाही, पण वाचायला ( म्हणजे वाचले असे सांगायला) हवे ते गंभीर, लेखन ही पुष्कळांच्या मनातील खूणगाठ असते. याउलट वाचताना आनंद देणारे, हलके फुलके वाटणारे लेखन असते त्यातील विचा-राचा भाग हा अधिक खोलही असू शकतो हे पुष्कळांना पटणे कठीण. मला वाटते आपण गंमीर हा शब्द ' सीरिअस' या इंग्रजी शब्दावरून बनवला. इंग्रजीतून भाषांतर-मार्गे शब्द बनवताना आपण त्याची पूर्वपाठिका, त्याच्या छटा, यांचा विचार करीत नाही. शब्दाला शब्द ठेवला की संपले. हे एकसारखे घडत आलेले आहे. इंग्रजीतच 'सिरिअस'च्या जवळपासचा ' सॉलेम ' हा शब्द आहे. त्याला एक स्पष्ट कुत्सितार्थी छटा आहे. म्हणजे ' सीरिअसनेस 'चे सोंग आणणारी, पोकळ खोटारडी वृत्ती. आपले बरेचसे ' सीरिअस ' लेखन फक्त ' सॉलेम ' असते. आपल्याला सगळेच ' गंभीर ' !

" खरे तर ' गंभीर ' चा संबंध खोलपणाशी आहे. (हे सांगण्यात व्युत्पत्तीचा भाषाशास्त्रीय खेळ नाही ! ) व तो जातिवंत वैचारिक लेखनाला सार्थपणे लागू पडतो आणि असे लेखनही वाचायला हलके फुलके, पचायला सोपे, आणि आनंद देणारे असू शकते, हे मान्य व्हायला हवे. आपण ' गंभीर ' म्हणून स्वीकारतो ( आणि वाचायचे टाळतो ) ते बरेचसे लेखन उथळ ( आणि घाईने उसनवारी .केल्यामुळे लेखकाला न पचलेले असते ) आणि त्यात खळखळाट फार— शब्दांचा आणि विद्वत्तेचा ! "

' सीरियस ' आणि ' सॉलम ' यांच्यामधल्या गोंधळाचे लोण थेट इंग्लिश भाषेपर्यंत थोडेसे पोचत असावे असे अर्नेस्ट हेमिंग्वे '(**डेथ इन द आफ्टर नून**) यांच्या म्हणण्या-वरून वाटते.

" A serious writer is not to be confused with a solemn writer. A serious writer may be a hawk or a buzzard or

even a popinjay, but a solemn writer is always a bloody owl. ''

आता बोला! serious / light–minded आणि solemn / frivolous अशा दोन जोड्या मानल्या तर मराठीतल्या याला जुळत्या जोड्या गंभीर / वाष्कळ आणि धीरगंभीर / थिल्लर अशा मानता येतील असे वाटते.

या चर्चेवरून एवढे मात्र लक्षात यावे की भाषाविवेक जेव्हा अर्थाच्या पातळीपर्यंत पोचतो तेव्हा तो काही वेळा जीवनविवेकाच्या वराच जवळ येतो. **भाषा आणि जीवन**-च्या वाचकांना तरी यात आश्चर्य वाटायला नको!

[ buzzard हा ससाण्याच्याच जातीचा अमेरिकन शिकारी पक्षी आहे; popinjay चा मूळचा अर्थ पोपट, तो अमेरिकेत शिष्ट, आखडू पुरुषाला तर ब्रिटनमध्ये डामडौली, मिरवण्याची हौस असलेल्या पुरुषाला लावतात. हेमिंग्वे अमेरिकन कादंबरीकार आहे.]

**अशोक रा. केळकर**

**बुद्धी आणि जीविका**

Intellectuals live for rather than off ideas.

विचारांवर पोट भरणारा तो बुद्धिकामगार, विचारांसाठी जगणारा तो बुद्धिजीवी.

**ल्यूइस ए. कोझर, मेन् ऑव्ह् आयडियाज् : अ सोसिऑलॉजिस्ट्स् व्ह्यू ( न्यूयॉर्क १९७० )**

## आजीव सभासद होऊ इच्छिणाऱ्यांसाठी सूचना

मराठी अभ्यास परिषदेचे जे १९८४ अखेरपर्यंत आजीव किंवा देणगीदार किंवा आश्रयदाता सभासद होतील त्यांना सुरुवातीपासूनचे म्हणजे १९८३ पासूनचे पत्रिकेचे अंक वेगळा आकार न घेता देण्यात येतील. परंतु १९८५ पासून जे परिषदेचे सभासद होतील त्यांना अगोदरच्या वर्षांचे अंक वेगळे विकत घ्यावे लागतील; फक्त त्या वेळी चालू असलेल्या वर्षापासूनचे अंक वेगळा आकार न देता मिळतील.

## लेखकांसाठी सूचना

**भाषा आणि जीवन** २ : १, हिवाळा १९८४, पृ. ५५–६ वर तपशिलावर सूचना दिल्या आहेत त्या अवश्य पाळून लेखकांनी सहकार्य करावे आणि संपादकाचे काम हलके करावे ही विनंती.

## वाचकांसाठी सूचना

पत्रिकेचे १९८३ चे दोन आणि १९८४ चे चार असे सहा अंक आता आपल्यासमोर आहेत. पत्रिकेचे स्वरूप नेमके काय असावे याबद्दलच्या संपादन-समितीच्या कल्पना या अंकांमधून अधिकाधिक मूर्त झाल्या असाव्या. यापुढची वाटचाल करताना लेखकांचे सहकार्य तर लागेलच, पण वाचकांचे सहकार्यही आम्हांला लागेल. वाचक पत्रिकेच्या प्रसाराचे काम मनावर घेतील, व्यक्तिगत सभासद किंवा संस्था–वर्गणीदार मिळवून देतील असा आम्हांला विश्वास वाटतो. पण वाचकांची मदत आणखी एका प्रकारे हवी आहे. पत्रिकेचे स्वरूप आतापर्यंत जे आहे त्यातला कोणता भाग कायम ठेवावा, कोणता बदलावा, कोणती भर त्यात घालून पहावी याबद्दलचे आपले विचार पत्राच्या रूपाने कळवावे अशी वाचकांना कळकळीची विनंती आहे. अगदी, पत्रिका आहे तशीच सध्या काही वर्षं राहू दे एवढेच जरी तुम्हांला म्हणायचे असले तरी तेही संपादकांना कळायला हवे. (संपादन–समितीच्या एखाद्या सभासदापाशी केवळ तोंडी काही सांगण्यापेक्षा पत्र पाठवले तर ते अधिक सोयीचे होईल हे उघड आहे. तर मग आपल्या मौखिक, किंबहुना मुखस्तंभ संस्कृतीपासून जरा दूर जाऊन पत्रलेखनाचे कष्ट आपण घेणार ना ?)

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक १९८४

१९८२ व १९८३ या वर्षांतील भाषाविषयक लेखनासाठी वरील पारितोषिक द्यायचे होते. त्यासाठी डॉ. कल्याण काळे (निमंत्रक), डॉ. मु. श्री. कानडे, व प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या परीक्षक-समितीने डॉ. अशोक रा. केळकर यांच्या वैखरी ( मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई १९८३ ) या पुस्तकास हे पारितोषिक देण्यात यावे असा एकमुखाने निर्णय जाहीर केला आहे. डॉ. केळकरांचे मनःपूर्वक अभिनंदन !

## वक्त्याची न्यायबुद्धी

भाषण बेतशीर लांबीचे असावे, इतके लहान नको की विषयावर अन्याय व्हावा, आणि इतके लांब नको की श्रोत्यांवर अन्याय व्हावा !



अनुक्रमणिका

# वर्ष १, १९८३ आणि वर्ष २, १९८४ यांची सूची

'**मराठी अभ्यास परिषद पत्रिके**'च्या पहिल्या दोन वर्षांत एकंदर सहा अंक प्रकाशित झाले– १:१ जुलै १९८३. ( ३७ पृष्ठे ); १:२ ऑक्टोबर १९८३ ( ४० पृष्ठे ); २:१ हिवाळा १९८४ ( ५६ पृष्ठे ); २:२ उन्हाळा १९८४ ( ४८ पृष्ठे ); २:३ पावसाळा १९८४ ( ५२ पृष्ठे ); २:४ दिवाळी १९८४ ( ६६ पृष्ठे ).

लेखकसूचीमधली नोंद अशी राहील : लेखक, अनुवादक, परीक्षणलेखक, परीक्षित पुस्तकाचा लेखक, किंवा चित्रकार याचे नाव / लेखन, परीक्षित पुस्तक, सदर याचे शीर्षक / वर्ष : अंक. पृष्ठांक.

लेखनसूचीमधली नोंद अशी राहील : लेखन, परीक्षित पुस्तक, सदर याचे शीर्षक/ लेखक, परीक्षण– लेखक याचे नाव / वर्ष : अंक. पृष्ठांक.

## लेखक-सूची

## लेखनसूची

ॐ

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. मनीऑर्डरने किंवा चेकने पैसे पाठविल्यास ते प्रा. प्र. ना. परांजपे, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, ११८ आगरकर, नगर, पुणे ४११००१ या पत्त्यावर पाठवावे. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास तसा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रु. वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्यातरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

| | १९८३ साठी | १९८४ साठी | १९८५ साठी |
|---|---|---|---|
| परिषदेचे सामान्य सभासद (सभासद–वर्गणी धरून) | १५ रु. | ३० रु. | ३० रु. |
| इतर व्यक्ती आणि संस्था वर्गणीदार | २० रु. | ४० रु. | ४० रु. |

सुट्या अंकाला १० रु.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरावयाचे आहेत. उदाहरणार्थ एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

सस्नेह नमस्कार, विशेष विज्ञापना

' भाषा आणि जीवन '
ही तुमची पत्रिका आहे ना?
ती निर्वेधपणे चालावी असे वाटते ना?

तर मग निदान —
१९८४ व १९८५ ची वार्षिक वर्गणी
( स्मरणपत्राची वाट न पाहता)
वेळेवर भरून टाका !

आणि शिवाय
एक तरी नवा सभासद
नवा संस्था—वर्गणीदार
जाहिरातदार
मिळवून द्या !

आणि हो —
पत्रिकेसाठी लिहापण
( स्मरणपत्राची वाट न पाहता )
निदान पानपूरके पाठवा
आणि कात्रणे
आणि अनुवाद
आणि उतारे
कदाचित चित्रंही, चित्रांसाठी कल्पना ...

पत्रिका आमची थोडीच आहे ?
ती आपली आहे ! परिषद आपण आहोत !

आपले,
पत्रिकेचे संपादक आणि व्यवस्थापन

